# नीलेचा दिलरुबा

लेखिका

सौ. शांताबाई नाशिककर, बी.ए.




सप्टेंबर १९४० कि. १॥। रुपये

# सौ. शांताबाई नाशिककर यांचें वाङ्मय

## प्रकाशित

### कादंबऱ्या

लग्नाचा बाजार
हाच का धर्म ?
साम्राज्यासाठीं
कौमुदी
चिखलांतलें कमळ
माझीं कोरीव लेणीं

### कथासंग्रह

नीलेचा दिलरुबा

### इतर

शांतिकुंज (निबंध पखरण)
शांतिकुंज (कविता पखरण)
म्हैसूरकडील प्रवास
(प्रवास वर्णन)
मुलांकरितां सुबोध गोष्टी

## आगामी

कीर्ति
(कादंबरी)

शांतिकुंज भाग २
(कविता पखरण)

?  ?
(कथासंग्रह)

# आमचें प्रकाशन

## प्रकाशित

१ नादनिनाद
कवठेकर

२ स्वाति
र. गो. सरदेसाई

३ नवा प्रातःकाल
खांडेकर

४ कलावंतांच्या सहवासांत
धनंजय

५ चांदण्यांतील सावल्या
कवठेकर

६ नीलेचा दिलरुबा
सौ. नाशिककर

## आगामी

भंगलेली मूर्ति ( कादंबरी )
श्री. बा. चिरडे

? ? ( कादंबरी )
सौ. नाशिककर

---

कॉंटिनेंटल प्रकाशन
१९६/१२ सदाशिव पेठ, टिळक रोड, पुणें २

# नीलेचा दिलरुबा

नीलेचा दिलरुबा
तुमच्या शत्रू तुम्हीच
कातलेली बावडी
योगायोग कीं दैवी घटना ?
आई ग !
काळसर्पाचा विळखा
पत्रांची अदलाबदल
प्रतिष्ठेचें मोजमाप
प्राणदान
बनवलेलीं बाहुलीं
वरदा
इंदिराबाईची दिनचर्या
खांचखळग्यांतला मार्ग

कॉन्टिनेन्टल् प्रकाशन
पुणें

# नीलेचा दिलरुबा

सहा वर्षांपूर्वीचा तो शेखरनें विचारलेला प्रश्न ! बरवर विनोदाचें आवरण असूनहि वास्तविक निकरावर येऊनच त्यानें विचारलें होतें, " नीला, तुला करायचंय् कीं नाहीं माझ्याशीं लग्न ?"

नीलेनें शेखरला चिडविण्यासाठीं मुद्दाम त्याच विनोदी आवरणाचा आश्रय घेऊन उत्तर दिलें होतें, " हो हो, तर ! अगदीं करायचंच करायचं."

या प्रश्नोत्तरांचें नीलेला आतां मनस्वी हसूं येऊं लागलें. विवाह-समारंभाला ती निघाली तेव्हांपासूनच तिला गंमत वाटून हसूं येत होतें. परंतु आतां समारंभाच्या मंडपांत खुर्चीवर स्थानापन्न झाल्यावर, समोरल्या प्रशस्त वेदीवरील कोचावर बसलेल्या वधुवरांकडे बघून तर तिला मोठ्यानें हंसावेंसें वाटूं लागलें.

शेखरनें नीलेकडे व शेजारींच बसलेले तिचे पति श्रीमान् वकील केशवराव ऊर्फ भय्यासाहेब भावे यांच्याकडे बघून किंचित्

स्मित हास्य केलें. त्या स्मितामध्यें कायकाय भावना लपलेल्या होत्या त्यांचा नीलेला पत्ता लागण्यापूर्वींच शेखरनें मान वळवली होती. क्षणभर त्याची दृष्टि खालीं गेली. त्या क्षणभरांत पूर्वींचीं बरींच दृश्यें त्याला आठवलीं असावीं आणि रजिस्ट्रारनें हांक मारतांच, चित्रपट चालू असतां अचानक दिवे लागल्याबरोबर मनुष्य जसा दचकतो तसाच तो दचकला. एक जोराचा श्वास घेऊन तो उठून उभा राहिला.

शेखरचा विवाहविधि नोंदणीपद्धतीनें लवकरच हेमलतेशीं झाला. या वेळीं शेंकडों मंडळी खुर्च्यांवरून बसलेली असून टांचणी पडली तरी आवाज ऐकूं येईल इतकी शांतता मंडपांत पसरली होती. नीलेशेजारीं तिचा तीन वर्षांचा मुलगा बसला होता. तो एरवीं इतका बोलका नी गडबड्या, पण तोदेखील दबकल्यासारखा गुपचूप बसून होता.

नीला वेदीवरील समारंभ बघत असतांच तिच्या अंतश्चक्षूंना तो पूर्वींचा प्रसंग दिसत होता. त्या प्रसंगाचीं प्रश्नोत्तरें तिला आठवत होतीं.

नोंदणीपद्धतीचा विवाहसमारंभ आटोपतांच वधुवरपक्षांकडील भटजींची धांवपळ सुरू झाली. कारण आतां जुन्या पद्धतीप्रमाणें मंगलाष्टकें, होम, सप्तपदी वगैरे विधि व्हावयाचे होते. चारपांच मुलेंमुली मंडळींना अक्षता वांटूं लागलीं.

आधुनिक नोंदणीविवाहाच्या वेळीं मंडळी शांत बसली होती; परंतु आतां मंडपांतहि देखावा बदलला. मंडळी आपापल्या स्नेह्यां-जवळ गप्पागोष्टी करूं लागली. एकदोन मुलेंहि रडूं लागलीं. बँडचें धुडुम् धुडुम्, धाड् धाड् सुरू झालें.

नीलेजवळ बसलेल्या तिच्या ओळखीच्या सरलाबाई तिला म्हणाल्या, " शेखर किती देखणे नी तेजस्वी दिसताहेत, नाहीं ? पोषाख तरी किती थाटांत केलाय्! पण मुलगी—अं—नाहीं बाई इतकी शोभत त्यांना. जरा बावळी दिसतेय्."

" अन् त्यांत ती पांढरं खादीचं पातळ नेसलीय ना ? त्यामुळं जास्तच बावळी दिसतेय्." मागल्या रांगेतल्या प्रमिलाबाईनीं संभाषणांत भाग घेतला.

सरलाबाई पुन्हां म्हणाल्या, " बी. ए. झालेली आहे. देशीचं व्रत घेतलं आहे."

अचानक प्रमिलाबाईनीं नीलेचें जॉर्जेट हातीं घेऊन प्रशंसेनें म्हटलें, " काय सुरेख रंग आहे पण ! अस्मानी रंगाला हे हिरवे जरीचे काठसुद्धां किती खुलून दिसताहेत !"

" या नीलाताई गोऱ्या नी सुरेख आहेत. त्यांना तें पातळ फारच शोभतंय्." सरलाबाईनीं प्रशंसा केली.

नीला किंचित् हंसली.

तितक्यांत मध्येंच आठवण झाल्याप्रमाणें प्रमिलाबाईच्या शेजारच्या बाईनें त्यांना विचारलें, " काय हो प्रमिलाबाई, शेखरांचं म्हणे कुणा दुसऱ्याच मुलीवर प्रेम होतं अन् तें फिसकटलं—"

प्रमिलाबाईनीं हा प्रश्न विचारणाऱ्या इंदूताईना मांडीला जरा चिमटा घेऊन डोळा घातल्यामुळें त्यांचें बोलणें अर्धवटच थांबलें.

आपलें त्या बोलण्याकडे लक्षच नव्हतें असें दाखवून वेदीजवळ बऱ्याच मुलांच्या घोळक्यांत उभ्या असलेल्या आपल्या मुलाला नीलेनें हांक मारली.

परंतु पाठीमागल्या बायकांत काय बोलणें आणि खाणाखुणा झाल्या असतील याचा तिला बरोबर अंदाज करतां आला.

प्रमिलाबाईंनीं नीलेकडे व शेखरकडे अंगुलिनिर्देश करून शेखरचें प्रेम नीलेवरच होतें ही माहिती इंदूताईंना करून दिली.

यावर इंदूताईंनींहि नीला-शेखरकडे अंगुलिनिर्देश केला व नंतर तर्जनी आणि अंगठा जुळवून त्यांनीं असा अभिनय केला कीं, नीला-शेखरांचा जोडा किती पण सुरेख जमला असता!

प्रमिलाबाईंनीं तिरस्कारव्यंजक दृष्टि नीलेच्या पतीकडे वळवली व मानहि उडवली.

इंदूताईंनीं "असं होय!" अशा अर्थाची मुद्रा करून भय्यासाहेबांच्याकडे पाहिलें.

लट्ठमुट्ठ बांध्याचे व रुंद, काळसर तोंडावळ्याचे भय्यासाहेब शेजारच्या एका स्नेह्याला म्हणत होते, "त्या भोपटकराला काय समजतंय्! टिळकांच्या राजकारणांत पडला म्हणून मोठा झाला. अरे, मी त्याच्या विरुद्ध पक्षाचा वकील असलों तर तो बेंबें करायला लागतो."

"अगदीं गांधींच्या शेळीसारखा का?" स्नेह्यानें विचारलें.

"तर काय रे!" भय्यासाहेब मोठमोठ्यानें हंसले.

आजूबाजूचेहि लोक हंसले. भय्यासाहेब मोठे खुशालून गेले.

इंदूताईंनीं कपाळाला हात लावून "नशीब, दुसरं काय?" असें म्हणत उसासा सोडला.

प्रमिलाबाई हळू स्वरांत उत्तरल्या, "प्रेम असो कीं प्रीति असो, सुशिक्षित असो कीं अशिक्षित असो, शेवटीं विधिलिखित म्हणूनच म्हणावं लागतं झालं."

लक्ष असल्यामुळें नीलेला हें बोलणें चांगलें ऐकूं आलें. पुढलें बोलणें ती ऐकूं लागली, पण तितक्यांत भटजींनीं वधुवरांमध्यें अंतरपाट धरून खड्या स्वरांत मंगलाष्टकें म्हणण्यास सुरुवात केली. सर्व मंडळी उठून उभी राहून वधुवरांवर मंगलाक्षता टाकूं लागली.

त्या अक्षता जशा हवेंत भिरभिरत होत्या, त्याचप्रमाणें नीलेच्या आयुष्यांतील पूर्वप्रसंगांच्या आठवणीहि तिच्या मस्तकांत भिरभिरत होत्या.

* * *

बी. टी.च्या वेळचे मुंबईतले ते मधुर दिवस. एकेक दिवस म्हणजे हापूसच्या आंब्यासारखा अवीट गोडीचा. तेथेंच कारणाकारणानें नीला-शेखरांची ओळख होऊन ती हळूहळू वाढत गेली. पुस्तकें, टीपा यांची अदलाबदल करतांकरतां अचानक त्यांच्या हृदयांचीहि जणूं अदलाबदल होऊन गेली. मलबार हिलवरील आणि जुहू-माटुंग्याच्या वाळवंटांतील ते मोठमोठे वादविवाद, 'समाजसेवा, स्वार्थत्याग, ध्येय' वगैरे शब्दांवर रचलेले मनोरे, तीं प्रेमकूजितें, बी. टी. करितां आलेल्या इतर विद्यार्थी-विद्यार्थिनींची सूचक थट्टामस्करी—किती मजेचे दिवस ते! विद्यार्थिदशा खरी, पण त्या दशेंतल्याप्रमाणें जीव दडपलेला मात्र नसायचा. कसें स्वतंत्र वातावरण!

शेखर एम्.ए. होऊन सांगलीला दोन वर्षे शिक्षक म्हणून काम करून नंतर बी.टी.करितां आला होता. नीला पुण्याला बी.ए. होऊन मुंबईला बी.टी.साठीं आली होती.

नीला आठवूं लागली–काय बरं त्या दिवशीं शेखर म्हणाला? आपण दिलरुबा वाजवीत होतों. तितक्यांत शेखर येऊन हळूच पाटीमागें बसला अन् वाजवणें संपतांच त्यानें टाळ्या वाजवल्याबरोबर आपण किती दचकलों!

तो म्हणाला, " नीला, तूं दिलरुबा वाजवतेस तेव्हां तुझा जो कांहीं मूड असेल तो त्या वाजवण्यांत उतरतो. "

नीलेनें एक निःश्वास टाकला.

आतां तो दिलरुबा भय्यासाहेबांच्या घरांत धूळ खात पडला होता. चारपांच वर्षांत नीलेनें त्याला स्पर्शहि केला नव्हता. लग्नानंतर नीला एकदां दिलरुबा घेऊन वाजवूं लागली तेव्हां भय्यासाहेब चेष्टेनें हंसून म्हणाले, " कसलं वाद्य हें ! काय आवाज पण ! आई मेल्यावर एखादं पोर कळवळून रडत बसावं तसं वाटतं. "

त्यानंतर नीलेनें हळूहळू दिलरुबावादन बंदच केलें. वकीलसाहेब घरीं नसतांना तिला दिलरुबा वाजवतां आला नसता असें नव्हे; पण तिचें मनच वाजवण्यांत रमेनासें झालें.

एकदां शेखर मुद्दाम नीलेला चिडविण्यासाठीं म्हणाला, "नीला, तुझा दिलरुबा इतका गोड कां वाटतो, सांगूं ?"

नीला प्रश्नार्थी मुद्रेनें भुंवया वर उचलून "हूं" म्हणून म्हणाली.

मग शेखरनें सांगितलें, "तुझा तो गोंडस गोरागोरा हात पड्यांवरून कसा झरझर चलाखीनं हालतो तें अगदीं फार छान दिसतं."

नीलेनें मुद्दाम कपाळाला आंठ्या घालून म्हटलें, " मी किनई, दिलरुबा ऐकायसाठीं वाजवीत असतें, पहायसाठीं नाहीं. तेव्हां पुन्हां दिलरुबा ऐकतांना डोळ्यांवर ढांपणं लावीत जा. समजलं ? "

किती दोघें हंसलीं होतीं त्यानंतर !

" आपल्याबरोबरची विद्यार्थिनी ती शारदा आणि शेखरांचे मित्र कमलाकर. आम्हांला चिडवतां चिडवतां त्यांनींच प्रीतिविवाह केला. कुठं बरं आहेत तीं दोघें ? बनारसला कीं—अलाहाबादला वाटतं. बिहारच्या भूकंपाच्या वेळीं शारदा अन् कमलाकर दोघें

शुश्रूषा-पथकांत गेलीं होतीं. त्यांचं नांव बऱ्याच वर्तमानपत्रांत झळकलं होतं. किती सुखी अन् मानसन्मानाचा संसार त्यांचा !"

म्हणजे नीलेला तसें कुठें कांहीं कमी नव्हतें. वैभव, मानसन्मान नीलेलाहि लाभत होता. बंगला, मोटार, नोकरचाकर, दागदागिने, कपडेलत्ते—कशाकशाची तिला वाण नव्हती. शिवाय मधूसारखा गोजिरवाणा मुलगा आणि नीलेची प्रतिकृतिच अशी किशोरीसारखी मुलगीहि तिला देवकृपेनें झाली होती.

किशोरी लहान असल्यामुळें तिला नीलेनें आतां आणली नव्हती. तिची आठवण होतांच नीलेच्या मनाला एक क्षणभर गोडशी हुरहूर वाटली. मधूला आतां तिनें कडेवर घेतला होता. त्याला प्रेमानें तिनें जरा जास्तच आवळून धरलें.

लोक हंसत कां होते ? नीलेच्या कानांवर मंगलाष्टकांचे शब्द पडूं लागले. शेखरच्या एका कवि-मित्रानें मुद्दाम विनोदी मंगलाष्टकें लिहिलीं होतीं. तो स्वतःच तीं खणखणीत आवाजांत म्हणत होता. त्यांत शेखरला आणि त्याच्या नवपरिणीत वधूला उपदेश केला होता. शेखरला उद्देशून म्हटलें होतें—

"मित्रा, ही तुझी नववधू नवसुशिक्षिताहि आहे. तेव्हां तिनं केलेली कढी जरी पातळ झाली तरी तिला उणंदुरं बोलून तिच्या डोळ्यांतल्या पाण्यानं ती आणखी पातळ करूं नको. तोंडाला रंगसफेती करण्याच्या नादांत तुझ्या बुटांना पॉलिश करण्याचं ती विसरली तरी तिला क्षमा कर. कारण हे नवमतांचे दिवस आहेत. तुझ्या जुन्या कल्पनांचा आतां बॉनफायर करून टाक."

लोक खूप हंसत होते. शेखरहि मोठ्यानें हंसत होता; पण नीलेला वाटलें, तें हंसणें वरवरचें पोकळ होतें अगदीं.

नीलेला हंसूं आलें; पण मंगलाष्टकांवरून तिचें लक्ष पुनः उडालें. ती पूर्वीच्या आठवणींत रंगून गेली.

* * *

बी. टी.च्या परीक्षेंत नीला-शेखर दुसऱ्या वर्गात उत्तम रीतीनें पास झालीं होतीं. त्या आनंदाच्या निकालाच्या दिवशींच शेखरनें नीलेला लग्नाविषयीं विचारलें आणि तिनें संमति दिली.

नंतर शेखर सांगलीला गेला आणि नीला पुण्याला आली. शेखरला लवकरच सांगलीच्या कॉलेजांत प्रोफेसराची जागा मिळाली. नीला सेवासदन हायस्कूलमध्यें काम करूं लागली.

लग्न दिवाळीनंतर पुण्यांत व्हावयाचें होतें. नीला-शेखरांची मध्यंतरीं गांठ पडली होती; तेव्हां त्यांनीं तारीखहि ठरवून टाकली होती.

कोणती बरं तारीख ? हं, नोव्हेंबर अठ्ठावीस.

तारीख चटकन् आठवल्याबद्दल नीलेला मोठें आश्चर्य वाटलें.

लग्नसमारंभ असाच प्रथम रजिस्टरपद्धतीनें आणि मागून वैदिक पद्धतीनें व्हावयाचा होता. शेखरच्या वडिलांनीं निक्षून सांगितलें होतें, " मुलगी तुझी तूं पाहिली आहेस; शिवाय रजिस्टर लग्नालाहि आम्ही संमति देतों आहों; तेव्हां आमच्या म्हणण्याप्रमाणं वैदिक विधीहि करायला हवा. नाहीं–होय चालणार नाहीं ! "

शेखरच्या आईनेंहि सांगितलें कीं, " थाटाची वरातीची मिरवणूक हवीच मुळीं. नाहींतर मी लग्नाला येणार नाहीं. "

अर्थातूच ही प्रेमळ अरेरावी आणि धाकदपटशा यांना मान्यता देण्यांत आली होती.

दिवाळीपूर्वी आठ दिवस शेखर पुण्यांत येऊन राहिला होता.

त्या आठ दिवसांत बहुतेक लग्नासंबंधींच बोलणीं होत. नीलेचे आई-बडील शेखरवर मोठेसे कांहीं खूष नव्हते. कारण तो घरचा सुखवस्तु असला तरी त्याचा पगार अगदींच एवढासा होता. परंतु हळूहळू रमाबाई समाधान दाखवून बोलूं लागल्या होत्या, " कुठून तरी पोरीला सुख लागलं म्हणजे झालं. मी म्हणतें आमची ही नीला पुष्कळ शहाणी, नाहींतर त्या द्वारकीनं नाहीं कां चाळीस रुपये पगाराच्या मास्तराशीं लग्न लावलंन् ? पुन्हां घर ना दार ! "

जाण्यापूर्वी दोन दिवस शेखर म्हणाला होता, " चल, नीला, आज आपण ताराचंदाच्या दुकानीं जाऊं. लग्नाच्या दिवशीं नेसण्या-करितां तुझ्यामाझ्या पसंतीनं शालूची ऑर्डर देऊन ठेवूं, म्हणजे शालू वेळेवर मिळेल. "

आणि नीलेनं सांगितलं, " शालूची ऑर्डर देऊं आपण. पण लग्नदिवशीं शुभ्र खादीचं पातळ नी ब्लाउज घालणार मी." आपला हट्ट शेखरनें बऱ्या बोलानें पुरवावा म्हणून दोन्ही ओंठ जुळवून तिनें ते लाडिकपणें चंबूसारखे पुढेंहि आणले.

या चारसहा महिन्यांत शेखरचें बघून नीलाहि देशी कापड वापरूं लागली होती. शेखर मनधरणी करूं लागला.

" पण नीला, एरवीं तूं देशी कपडे वापर. मी नाहीं म्हणतों कां तुला ? मला त्यांत आनंदच आहे. पण अगदीं लग्नाच्या दिवशीं एवढ्या मोठ्या समारंभांत तूं शालू नेसलीस म्हणून काय झालं ? "

" मी किनई अगदीं मनोमन ठरवून टाकलंय्, कीं लग्नाच्या दिवशीं खादीचं पातळच नेसायचं. "

यावर शेखरनें जवळ येऊन नीलेची हनुवटी वर उचलून तिच्याकडे स्निग्ध दृष्टीनें पाहत म्हटलें होतें, " खादीच्या पातळानं

देखील तूं मनोज्ञ दिसतेस. खरी गोष्ट. पण बनारसी शालूनं तूं अतिशयच सुरेख दिसशील ही माझी खात्री आहे, अन् माझ्या पत्नीला लोकांनीं 'नक्षत्रासारखी सुंदर आहे' म्हणून म्हणावं अशी माझी फार इच्छा आहे."

मंडपांतील लोक हंसत होते तेव्हां नीलाहि हंसली. पण नीलेचें हंसणें कसेंसेंच होतें.

नीलेला मनांतून वाटलें, 'इतकी सुरेख मनधरणी शेखरनें केली असतांना आपण कां बरें आपला हट्ट चालू ठेवला? आपलें खादीचें व्रत तरी काय मोठें दहापांच वर्षांचें जुनें होतें थोडेंच!' नीलेनें शेखरचा हात बाजूला सारून मानेनेंच नकार दर्शविला होता.

नीला आपला हट्ट सोडीत नाहींसें पाहून शेखरनें निकरावर येऊन विचारलें होतें, "नीला, तुला करायचंय की नाहीं माझ्याशीं लग्न?"

यावर नीलेनें हंसत हंसत, मान हलवीत, नेत्र विस्फारून उत्तर केलें होतें, "हो हो, तर. अगदीं करायचंच करायचं. पण तें खादी नेसूनच करायचं."

शेखरचें तोंड एकदम उतरून गेलें. "जातों" म्हणून सांगून तिच्या आग्रहाला न जुमानतां, कांहीं न खातां पितां तो निघून गेला तो एकदम सांगलीला.

नीलेला वाटलें होतें, शेखर आपल्या प्रेमाखातर माघार घेईल. त्यानं माघार घेतलीच पाहिजे.

शेखरहि फुलावर झुलणाऱ्या पांखराप्रमाणें आशेवर आंदोलनें घेत होता. पण दोघांपैकीं कुणीहि मनाचा पीळ उलगडीना.

आणि मग सूर्यास्तानंतर हळूहळू पसरणाऱ्या काळोखाप्रमाणें दोघांच्याहि आयुष्यांत निराशेचें साम्राज्य पसरूं लागलें.

काय भयंकर वर्ष गेलें तें ! त्या आठवणीनें नीलेच्या अंगावर कांटा आला. पीळ सुटला नाहीं; पण शेवटीं त्याची रक्षा मात्र झाली.

नेसलेल्या जॉर्जेटकडे नीलेचें लक्ष गेलें. ‘ कुठें गेलें आपलें तें ध्येय ? ’ भय्यासाहेबांशीं लग्न झालें तेव्हांच तें व्रत पार संपुष्टांत आलें होतें. नीलेला खादी डोळ्यांसमोर नकोशी झाली होती. भय्यासाहेबांना त्यांत आनंदच होता.

शेखर निघून गेल्यावर वर्षानें नीलेच्या आईवडिलांनीं भय्यासाहेबांचें स्थळ पाहिलें आणि नीलेनेंहि लग्नाला संमति दिली.

प्रथम भय्यासाहेबांसारख्या नीरस आणि लौकिकप्रतिष्ठा व पैसा यांतच समाधान मानणाऱ्या मनुष्याशीं संसार करतांना नीलेला जरा जडच गेलें; पण भय्यासाहेब म्हणतील तशी ती वागत गेल्यामुळें त्यांच्या संसारांत भांडणें फारशीं झालींच नाहींत.

मग मधु झाल्यावर नीला आपल्या संसारांत रमूं लागली. शेखरची आठवण एखाद्या सुंदरशा सफरीप्रमाणें स्मृतिकपाटांतल्या पाठीमागच्या कप्प्यांत धूळ खाऊं लागली आणि किशोरी झाल्यावर तर तिच्यावर धुळीचा थर कायम चिकटून बसला.

शेखरची लग्नाची निमंत्रणपत्रिका वाचून तिची स्मृति एकदम पाणी पडल्याप्रमाणें साफसूफ झाली होती.

तिला राहून राहून नवल वाटत होतें कीं, आपला तो स्वाभिमानी स्वभाव आतां कुठें लोपला ? आपलें तें स्वतंत्र व्यक्तिमत्व आपण कुठें अन् केव्हां हरवून बसलों ? भय्यासाहेबांजवळ ? इतक्या निमूटपणें ? कां बरें ?

आणि शेखरचें तरी खादीचें व्रत कसें संपलें आणि आज त्याच्या वधूनें खादीची साडी परिधान केली हें त्याला खपलें कसें ? याचेंच तिला हसूं येत होतें. हेंच कोडें ती उलगडूं पाहत होती.

तितक्यांत वधुवरांनीं एकमेकांच्या गळ्यांत हार घातले. टाळ्यांचा कडकडाट, बँडवाजंत्रींचा घडघडाट आणि बोलण्याचा कलकलाट यांनीं मंडप दुमदुमून गेला. हळदीकुंकू, पानसुपारी घेऊन स्त्रीपुरुष जाऊं लागले.

वधुवरांना कोणी देणग्या, आहेर वगैरे देत होते. नीला व भय्यासाहेब यांनीं एक, आंतून मखमलीनें मढवलेली कप्याकप्यांची चांदीची दागिन्यांची पेटी आहेरासाठीं आणली होती. ती देण्यासाठीं तीं दोघें बेदीवर गेलीं.

नीलेनें वधूच्या हातीं औपचारिक स्मितासह आहेर दिला व वधूनें तशाच तऱ्हेनें त्याचा स्वीकार केला.

शेखरनें त्या दोघांनाहि " जेवायला आलेंच पाहिजे " म्हणून खूप आग्रह चालवला. नीलेची इच्छा नव्हती; पण भय्यासाहेबांनीं होकार दिल्यावर ती गप्प बसली.

शेखर तिच्याकडे वळून म्हणाला, " आणि नीलाताई, आणखीहि थोडी विनंति तुम्हांला करायची आहे. "

नीलेनें आश्चर्यानें विचारलें, " ती कोणती ? "

" तुम्ही आपला दिलरुबा घेऊन या अन् पंक्तींत एकदोन गाणीं वाजवून दाखवा. फार दिवस झाले तुमचा दिलरुबा ऐकून." शेवटच्या वाक्यांत एक प्रकारची आतुरता व उत्कंठा नीलेला प्रतीत झाली.

नीला खिन्नपणें हंसली व म्हणाली, " माझा दिलरुबा होय् ?

तो पडलाय् कितीक वर्षे धूळ खात." तिच्या डोळ्यांत अश्रू चमकल्याचा शेखरला भास झाला.

"खरंच हें?" शेखरनें कातर स्वरांत थोडा अविश्वास दाखवून विचारलें.

"अहो, तर काय?" भय्यासाहेबांनीं मोठ्यानें हंसून उत्तर दिलें. "अन् बरं झालं तो धूळ खात पडलाय् तो. नाहींतर ही नीला दिलरुबा वाजवायला लागली कीं, इकडे मला आईच्या आठवणीनं रडावंसं वाटायचं. छीः, कसलं रडकं वाद्य! काय तुम्हां लोकांना आवडतं कुणास ठाऊक!"

"नीलेच्या दिलरुब्यानं रडूं येतं?" शेखर पुटपुटला. त्यानें आपणा स्वतःलाच जणूं प्रश्न विचारला. नंतर नीलेच्या पायांचा चाललेला अस्वस्थ चाळा पाहत असलेली दृष्टि, जरा जास्तच गोंडस झालेल्या व जॉर्जेटच्या व्यवस्थित सुरकुत्यांनीं अधिकच शोभून दिसणाऱ्या नीलेच्या तनुलतिकेवरून वर सरकवीत त्यानें तिच्या दृष्टीला मिळवली.

त्या दृष्टीनें नीलेला व्यथित केलें. ती दृष्टि म्हणत होती, "नीला आपण काय केलें हें? अन् कशाकरितां असें बागलों आपण?"

तितक्यांत वेदीच्या पायऱ्या मोठ्या कष्टानें वर चढून येऊन मधू आईच्या पायांना बिलगला. नीलेचा पदर धरून आपल्या बोबड्या वाणीनें तो बोलला, "आई, चल ना ग लवकल आपल्या घलीं. किछोलीं ललेल नाईतल."

नीलेनें चट्दिशीं मधूला उचलून घेतलें. "चला, घरीं जाऊं

या हं आपण. पण आधीं या शेखरमामांना आणि या नव्या मामींना नमस्कार कर बरं."

मधूनें आपले चिमुकले, गुबगुबीत हात जोडतांच नीलेचें अंतःकरण मातृप्रेमानें उचंबळून आलें. शेखरकडे बघून ती हंसली तेव्हां शेखरला तिच्या दृष्टींत केवढा अभिमान दिसला !

---

# तुमच्या शत्रू तुम्हीच

" विमाताई ग, ही खिलकी मला नाहीं कलतां येत. तूं कलतेस ? "
पांच वर्षांचा प्रभाकर आपल्या दोन वर्षांनीं वडील असलेल्या बहिणीला म्हणाला.

आज रविवार असल्यामुळें विमलेला सुट्टी होती. विमला शाळेंत गेली कीं प्रभाकर एकटाच घरीं राहत असे. ती परत येईपर्यंतचा वेळ प्रभाकराला मोठा कंटाळवाणा वाटे. संध्याकाळींच काय तें त्याला थोडेंसें खेळावयास मिळे. रविवारीं मात्र बहीणभावंडांना मनमुराद खेळावयास वेळ मिळत असे. म्हणून प्रभाकर रविवारच्या दिवसाकडे डोळे लावून बसत असे.

आज आईनें भातुकलीला लाडू व पोहे दिल्यामुळें मुलें मोठ्या मजेनें खेळत होतीं. दोघेंहि जाड कागदांचा बंगला करण्यांत गुंतलीं असून विमला कौलार रंगवीत असतां प्रभाकराकडे खिडकी

पाडण्याचें काम आलेलें होतें. तें नीट करतां येईना म्हणून प्रभाकरानें तें करण्याबद्दल आपल्या बिमाताईला विचारलें.

" अहारे वेड्या, इतक्या वेळां करून दाखवलं तरी येत नाहींच का ? आण इकडे तो तुकडा. मी दाखवतें करून. "

बिमाताईनें खरोखरीच भरकन् खिडकी कापून टाकली. प्रभाकर आपल्या बहिणीचें कौशल्य त्याच्या लहानशा मनांत जी कांहीं आदराची भावना होती तिनें पाहत होता. त्याच्या मनांत मुळींच वैषम्य आलें नव्हतें.

कागदी घर थोड्या वेळानें तयार झालें.

त्यांतील सामानसुमानहि कागदी असून तेंहि नीट ठेवण्यांत आलें.

" प्रभा, तुझी ती आगगाडी आण ना. या इथें आपण स्टेशन तयार करूं या. "

" ऊं:! मी नाहीं देनाल जा माजी गाली." आईनें गाडी घेऊन दिल्यापासून प्रभाकरानें बिमाताईला तिला हात लावूं दिला नव्हता. बिमाताईला तर ती गाडी चालविण्याची अनावर इच्छा होती. आईनें आपल्यालाहि तसली गाडी घेऊन दिली नाहीं याबद्दल तिला मोठें वाईट वाटत होतें.

" अरे आपण दोघे खेळूं या ना गड्या तिच्याशीं." बिमाताई विनवूं लागली.

" नाहीं देत म्हतलं ना !" प्रभाकरानें ऐटींत सांगितलें. "माझी गाली मोलून टाकशील तूं."

" असं कां ? बरं तर. " बिमाताई फुरंगटून म्हणाली. " माझा खेळ मी पण तुला नाहीं देणार. हात लावूं नको माझ्या या

बंगल्याला. जा. तूं आपला गाडी घेऊन बैस." प्रभाकर कागदी बंगल्याची खिडकी उघडीत लावीत होता, त्याचा हात हिसडून विमाताई म्हणाली.

झालें, प्रभाकर एकदम चिडून गेला. त्यानें विमाताईच्या हाताला चांगलाच चावा घेतला आणि वर स्वतःच भोकाड पसरून आईकडे तो रडत गेला.

प्रभाकर सीताबाईचा अतिशय लाडका होता. कसें झालें तरी तो मुलगा होता. विमलेवर सीताबाईचा पहिल्यापासूनच राग होता. पहिला मुलगा व्हावा अशी बायकांची नेहमींच इच्छा असते. सीताबाई पुत्रमुख पाहण्यासाठीं अगदीं आतुर झाल्या होत्या. मुलगा व्हावा म्हणून त्या परमेश्वराची प्रार्थनाच नव्हे, तर नवसहि करीत असत. आणि इतकें करून शेवटीं त्यांना मुलगीच झाली. याबद्दलच सीताबाईचा विमलेवर राग होता. जणुं विमलेनें जाणून-बुजून, आईला दुखविण्यासाठींच पहिल्यानें जन्म घेतला होता!

प्रभाकर झाल्यावर सीताबाईचा विमलेवरील राग कमी झाला; पण त्याऐवजीं प्रभाकरावर त्या अतोनात प्रेम करूं लागल्या. विमलेला प्रत्यहीं भेदाभेद जाणवूं लागला.

विमलेला कित्येक वेळां प्रभाकरासाठीं मारहि मिळत असे. प्रभाकराचे हट्ट आईकडून लगेच पुरविले जात, तर विमलेला हट्ट करण्याबद्दल मार मिळे. नाना मात्र विमलेचे हट्ट थोडेबहुत पुरवीत; कारण त्यांचें दोन्ही मुलांवर सारखेंच प्रेम होतें. तरी घरांत सीता-बाईचें वर्चस्व असल्यामुळें प्रभाकराचेच लाड जास्त होत. त्यामुळें प्रभाकर लाडावून गेला होता. त्याचा स्वभाव हट्टी आणि चिडका बनला होता. यामुळें खेळतांना बहीण-भावंडांचें भांडण झालें

नाहीं असें क्वचितच होई. पण बालस्वभावानुसार तीं भांडण विसरून पुन्हां एक होत.

प्रभाकरानें सीताबाईना आपली बाजू चांगलीच रंगवून सांगितल्यामुळें त्या रागारागानेंच बाहेर आल्या.

" काय ग कार्टे, कां उगीच रडवलंस त्याला ? धाकट्या भावाला गोडीगुलाबीनं खेळवायचं सोडून सदा भांडण करीत असतेस. "

विमला आईच्या शब्दांनीं घाबरूनच गेली. " आई, मीं नाहीं ग त्याला रडवलं. तोच माझ्या हाताला चावला आणि आतां आपणच कांगाव करतो आहे. हें बघ हातावर त्याचे दांतसुद्धां उठले आहेत."

" आई, मी नाहीं ग चावलों. ती खोटं बोलते आहे. "

प्रभाकर बोलला कीं सीताबाईना तें खरें वाटायचेंच.

" खोटं बोलतेस ! " सीताबाई विमलेच्या पाठीवर रट्टा मारून म्हणाल्या. " मीं त्याला मारावं म्हणून आळ घेतेस त्याच्यावर ! प्रभा, बाळ, काय पाहिजे होतं तुला ? " लगेच सीताबाईचा स्वर कोमल बनला.

" ही किनई माझी गाली मागते अन् मला हा बंगला देत नाहीं. आमी दोघांनीं केला आहे तो तयाल. " प्रभाकरानें लडिवाळपणानें सांगितलें.

" काय ग, किती वेळां सांगितलं आहे तुला कीं असं भांडायचं नाहीं म्हणून ! बंगल्याशीं तो जरा खेळला म्हणून काय झालं ? दे त्याला बंगला. प्रभा, विमी भांडली ना तुझ्याशीं ? देऊं नको

तिला तो बंगला मुळींच अन् तिच्याशीं खेळूं पण नको हं." सीताबाई विमलेला किती तरी बोलत स्वैपाकघरांत चालत्या झाल्या.

विमला बिचारी कोपऱ्यांत बसून मुसमुसत रडत होती.

इकडे प्रभाकर विमलेनें केलेला कागदी बंगला घेऊन आपल्याशींच खेळत होता. 'बंगला देत नव्हती नाहीं कां? कसा मार देववला आईकडून!' ह्या विजयानें प्रभाकर आनंदून गेला होता.

'मी मुलगा; माझ्या मनाप्रमाणें विमीनें वागलेंच पाहिजे.' अशी भावना एव्हांपासूनच प्रभाकराच्या मनांत भिनत चालली होती.

आणि त्याला कारण कोण? तर सीताबाईच!

* * *

"विमे!"

विमला माजघरांत बसून अभ्यास करीत होती. सीताबाईंची हांक ऐकतांच तिच्या कपाळाला सतरा आंठ्या पडल्या.

"काय ग?" विमलेनें बसल्या जागेवरूनच ओ दिली.

"तिथल्यातिथून काय बोलतेस?" सीताबाई चिडून बोलल्या. "पानंबिनं कांहीं मांडायचीं आहेत कां नाहींत? ह्यापिसाची वेळ झाली, समजत नाहीं?"

विमला हातांतलें पुस्तक जमिनीवर आपटून रागारागानें स्वैपाकघरांत जाऊन उभी राहिली. "ऐकलंस कीं नाहीं?" सीताबाई खेंकसल्या. "पानं मांड लवकर."

"आई, माझी परीक्षा चार दिवसांवर आली आहे. माझा अभ्यास तर झाला पाहिजे?"

विमलेची इंग्रजी पांचवीची परीक्षा आली होती. सीताबाईंच्या मनांत केव्हांच तिचें लग्न करावयाचें होतें. पण नानांनीं बायकोचें न ऐकतां विमलेचें शिक्षण चालू ठेवलें होतें. सीताबाई तिला अभ्यासाला वेळच मिळूं देत नसत. म्हणजे बळेनें नव्हे, पण तिच्या अभ्यासाचें त्यांना महत्त्वच वाटत नसे. " बायकांनीं शिकून करायचं काय ! चुलखंडच फुंकायचं ना ! " असें त्या बोलत आणि बहुतेक कामें त्या विमलेला करावयास लावीत. नानांना ह्या बारीकसारीक गोष्टी कळतच नसत.

"एवढंतेवढं काम सांगितलं कीं तुझा चरफडाट होतो. मींच सारखं मोलकरणीसारखं घरांत राबावं असं तुझं म्हणणं होय ! "

" तसं नव्हे, आई, परीक्षा झाली म्हणजे मी सगळं सुद्धां काम करीन. आतां चार दिवसांपुरतं मी म्हणतें आहें. आणि प्रभाकराची परीक्षा आटपलेली आहे. तो कादंबरी वाचीत बसलेला आहे, त्याला बोलावीनास पानं मांडायला ! "

सीताबाई आश्चर्यानें पोळी लाटण्याचें बंद करून डोळे मोठमोठे करून विमलेकडे पाहूं लागल्या.

" काय म्हणालीस ! प्रभाकराला पानं मांडायला सांगूं ! हीं घरकामं पुरुषांचीं नाहींत हो. बायका शिकल्या तरीहि बायकांनींच करायचीं. " सीताबाई टोंचूनखोंचून बोलत होत्या. " शाळेंत जाऊन चांगलं शिकलीस हो ! तिकडं हट्टानं शाळेंत घातलं. पहा म्हणावं आपल्या मुलीची अक्कल ! आतां आईला उत्तर देतेस. लग्न झाल्यावर मग सासूला दे उत्तर. नाहीं तर आतां मी नाहींच शिकूं देणार तुला. चवचालपणा शिकायलाच शाळेंत जायचं कीं नाहीं ! नाहीं तर उद्यां नवऱ्याला सांगशील सैंपाक करायला अन् आपण

बसशील खुर्चीवर पुस्तक वाचीत!" एक न् दोन, सीताबाई सारख्या बोलत होत्या.

बिचारी विमला अभ्यासाची आशा सोडून पानें मांडीत होती.

"खरंच या दुहेरी काचापेक्षां लग्न झालेलं बरं." विमला आपल्या मनाशींच म्हणाली. "नाना चांगले शिकवायला तयार आहेत तर आईच शिकूं देत नाहीं."

विमला नापास झाली. तिला अभ्यास करायला वेळ न मिळाल्यानें ती नापास झाली, हें नानांना कुठून कळणार? पण विमलेचें नुकसान झालें. तिला पुष्कळ शिकवण्याची नानांची इच्छा विमला नापास झाल्यामुळें मंदावली. त्यांत सीताबाईचा लग्नाचा आग्रह.

विमलेच्या अभ्यासाची इतिश्री झाली. ज्येष्ठांतच अचानक चांगलें स्थळ आल्यानें विमलेचें लग्न उरकून घेण्यांत आलें.

* * *

"काय, आज तरी झाला आहे कीं नाहीं धडा?" विनायकरावांनीं आपल्या पत्नीला—विमलेला—विचारलें.

विमला विनायकरावांच्या खुर्चीजवळच्याच एका खुर्चीवर बसली होती. समोर टेबलावर सहावीचें इंग्रजी पुस्तक उघडें पडलें होतें. उत्साही विनायकराव आपल्या पत्नीला सुशिक्षित करण्याच्या इच्छेनें तिला रात्रीं शिकवीत असत.

विमला खालीं मान घालून बसली होती. तिला रडूं येत होतें, तें ती ओंठ चावून चावून घालविण्याचा प्रयत्न करीत होती आणि तो प्रयत्न विनायकरावांना दिसूं नये म्हणून पदराचें टोंक तिनें तोंडाशीं धरलें होतें.

विमला बोलत नाहींसें पाहून विनायकरावांनीं तिचा हात आपल्या हातीं घेतला आणि तिचें मुख वर उचलून विचारलें, " आजहि नाहींच कां झाला अभ्यास ? "

विमलेला या प्रेमळ कृतीनें आपलें रडूं आंवरणें अशक्य झालें. हुंदकेवजा आवंढा गिळून ती म्हणाली, " पुरे बाई तो अभ्यास ! आज चार महिन्यांत चार धडे कांहीं झाले नाहींत. मी तरी काय करूं ? काम नसलं तरी पुस्तक वाचणं सासूबाईंना खपत नाहीं. पुन्हां फुरसतीच्या वेळीं जाऊबाई कांहींतरी मुलांचं शिवणकाम काढतात. मग मला त्यांना मदत करावी लागते. बाईनीं विणकाम केलं तरी चालतं, पण मी अभ्यास करूं लागलें कीं सासूबाई रागाव-तात, वाटेल तसं बोलतात अगदीं. बाईदेखील शिकवायचं असतं म्हणून घालून पाडून बोलतात. ' पुरुष म्हणाले तरी आपण ताळ सोडतां कामा नये ' असा उपदेश मला दोघी करतात. "

विनायकरावांनीं कपाळाला आठ्या घातल्या. " फारच छान उपदेश करतात म्हणायच्या. त्या उपदेश करणाऱ्या अन् तुम्ही ऐकणाऱ्या. " ते तिरस्कारानें हंसले.

विमलेनें इतका वेळ आंवरून धरलेले अश्रू आतां मात्र भराभर नेत्रांवाटे बाहेर पडूं लागले.

तें पाहून विनायकरावांना आपण पत्नीला उगीच टोंचून बोललों म्हणून वाईट वाटलें. त्यांनीं विमलेला एकदम जवळ ओढलें. "विमले, मी निराशेच्या भरांत तुला तसं बोलून गेलों. त्याचं इतकं कां वाईट वाटलं तुला ? हें बघ, तूं पुष्कळ शिकावंस अशी माझी फार फार इच्छा आहे. तुला देखील ती इच्छा आहे हें मला सम-जतं. पण त्या शिकण्यासाठीं तुला इतका मनस्ताप सहन करावा

लागत असेल तर राहूं दे तें शिकणं. आतां माझी एम्. ए. ची परीक्षा झाली कीं धरतों नोकरी. मग आपण स्वतंत्र बिऱ्हाड केल्यावर तुला शिकवीन मी. हं हांस पाहूं आतां ! दे तें पुस्तक टाकून तिकडे. ”

स्वतःच विनायकरावांनीं समोरलें पुस्तक उचलून दूर भिरकावून दिलें. तें करतांना त्यांनाहि वाईट वाटलें आणि शिकणें संपलें असें वाटून विमलेलाहि वाईट वाटलें. पण दोघांनींहि तें वाईट वाटणें बळेनें हंसून झांकून टाकलें.

पतीनें आपल्या सुखासाठीं हा स्वार्थत्यागच केला आहे असें मनांत येऊन विमलेला त्यांच्याविषयीं कृतज्ञता वाटली.

*    *    *

“ विमाताई, एक गोष्ट तुला विचारूं कां मी ? ” मागील पतिपत्नींच्या संवादाला आठ वर्षें झालीं होतीं. विमला बी.ए. झाली होती. पण—

पण तें पतीच्या प्रेमछत्राखालीं नव्हे, तर वडिलांच्या मायाछत्राखालीं. कारण दुष्ट काळानें लग्नानंतर एका वर्षानेंच विनायकरावांवर झडप घालून विमलेच्या प्रेमसाम्राज्याला आग लावली होती.

नानांनीं विमलेला माहेरीं आणलें आणि तिला शाळेंतहि घातलें. या बाबतींत त्यांनीं सीताबाईचें मुळींसुद्धां ऐकलें नाहीं. शिवाय विमलेला काम सांगावयाचें नाहीं, अशीहि त्यांनीं ताकीद दिली होती. विमलेला शिकून नोकरी धरून चरितार्थ चालवला पाहिजे, याची जाणीव सीताबाईनाहि असल्यामुळें त्यांनीं पतीची अवज्ञा केली नाहीं आणि म्हणूनच विमला बी.ए. झाली. प्रभाकर

पहिल्यानें मागें असला तरी विमलेचीं मध्यें शिकण्याचीं दोन वर्षे बुडाल्यानें विमलेबरोबर आला होता. म्हणून यंदा दोघें एकदमच बी.ए. झालीं होतीं.

विमलेनें लगेच नोकरी धरली आणि प्रभाकर एल्‌एल्‌.बी. च्या टर्म्स् भरूं लागला. याहि गोष्टीला चार महिने झाले होते.

विमला आज सहज कांहीं वाचीत बसली असतां प्रभाकरानें जरा बिचकतच हा वरील प्रश्न विचारला होता.

विमला चमकली. प्रभाकराच्या प्रश्न विचारण्याच्या तऱ्हेवरूनच तिनें प्रश्नाचा ओघ जाणला होता.

" हूं ? " विमलेनें विचारलें.

प्रभाकर बोलूं कीं न बोलूं म्हणून घोटाळत होता. आज किती तरी दिवस हा विषय काढण्याचें मनांत असून त्याला धैर्य होत नव्हतें. आज अगदीं त्यानें मनाचा निर्धार केला होता. तरी वेळ येतांच तो गोंधळला.

" असं काय एवढं विचारणार आहेस ? " विमलेनें पुनः विचारलें.

" विमाताई, ते एंजिनियर केळकर माहीत आहेत ना तुला ? त्यांना दोनशेंची नोकरी मिळाली आहे."

" मग ? " विमलेनें जरा हंसत विचारलें, " लागली असेल नोकरी. "

" ते लग्न करताहेत. " प्रभाकर म्हणाला.

" केव्हां ? " विमलनें सहज विचारलें.

" ठरलेलं नाहीं त्यांचं अजून. पण ते मला विचारीत होते. स्वभावानं अतिशय चांगला माणूस आहे तो. तुला तो सुखांत

ठेवील यांत बिलकुल शंका नाहीं. नानांची देखील फार फार इच्छा आहे तूं लग्न करावंस म्हणून."

विमलेनें एक दीर्घ निश्वास सोडला. "आहे हें आयुष्य ठीक आहे कीं."

"म्हणजे जन्मभर तूं आपली तपस्विनीसारखी एकटी आयुष्य कंठणार? विमाताई, पुनर्विवाहांत तुला कांहीं अधर्म तर वाटत नाहीं ना?"

"तसं नाहीं रे वाटत." विमलेनें निराशापूर्ण स्वरांत म्हटलें. "पण तसं एकटीदुकटीला वाटून उपयोग काय? रूढी पडली आहे खरी. तिच्याविरुद्ध जाण्याचं धैर्य मला तर कांहीं नाहीं."

"विमाताई, तुझ्यासारख्या शिकलेल्या बायकांनीं रूढीला भ्यायचं हें योग्य आहे कां? तुझ्यासारख्यांनीं तर इतर हजारों विधवांना सन्मार्ग दाखवून द्यायचा. विमाताई, मी आणि नाना तुझ्या पाठीमागें असतांना तूं कां भितेस? केळकरांच्यासारख्या सज्जन माणसाच्या सहवासांत तुला समाजाचा त्रास जाणवायचा सुद्धां नाहीं. विमाताई, उगीच कां नाहीं म्हणतेस?"

"प्रभाकर, उगीच कशाला वाईट वाटून घेतोस? मी या गोष्टीचा विचार केलेला आहे. मला पुनर्विवाह करायचा नाहीं. रूढी नाहीं म्हणूनच करायचा नाहीं." विमलेनें निक्षून सांगितलें. तिचा स्वरच असा होता कीं जास्त बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें प्रभाकराला कळून आलें; पण विमलेच्या या विचारानें प्रभाकराला अतोनात वाईट वाटलें.

" विमाताई, तुम्ही बायका या अशाच." जरा चिडूनच प्रभाकर म्हणाला. " नेहमीं आपलं येरे माझ्या मागल्या करीत बसायचं. पुरुष तुम्हांला हात धरून उन्नतीच्या मार्गावर आणायला पाहतात तर तुम्हांला पुढं पाऊल घेण्याचं धैर्य नाहीं. कितीक बायका पुरुषांच्या नांवानं खडे फोडीत असतात, पण खरं पाह्यलं तर तुमच्या तुम्हीच शत्रू आहांत; पुरुष नव्हेत. "

विमलेनें नुसतें खेदपूर्वक हंसून अनुमोदन दिलें.

---

# कातलेली वावडी

अष्टभुजेच्या टेकडीवरून सभोंवतालचा देखावा अत्यंत रमणीय दिसत होता. एका बाजूला असलेलें शहर हिरव्याचार झाडीच्या पडद्यावर काढलेल्या चित्राप्रमाणें दिसत होतें. शहराच्या एका अंगानें वाहणारी लांब नदी, तिच्यावरील ठिकठिकाणचे पूल, गांवाबाहेरील शेतजमिनी व अगदीं विरळ बंगले. या दृश्यावरून दुसऱ्या बाजूस पाहिलें कीं, दूरवर एकावर एक डोंगरांच्या ओळी दिसत. जणुं एखाद्या भगीरथानें स्वर्गद्वार गांठण्यासाठीं या प्रचंड पायऱ्या रचल्या होत्या. अगदीं पाठीमागल्या सर्वांत उंच डोंगरावर मावळणारें आरक्त सूर्यबिंब म्हणजे जिन्यावर लावलेल्या विद्युत्-गोलकाप्रमाणें शोभत होतें.

आम्ही दोघी बसलों होतों तेथून कांहीं अंतरावर चारपांच मुलें पतंग उडवीत होतीं. आश्विन महिन्यांतील संथ वायुलहरींवर ते

रंगीबेरंगी पतंग उंचउंच भराऱ्या मारीत होते. पाहतां पाहतां त्या पतंगांच्या जयापजयाकडे आमचेंहि लक्ष वेधलें. एक पांढरा पतंग किती तरी उंच गेलेला होता. एखाद्या टिकलीसारखा दिसत होता तो. पण मुलांनीं चालविलेल्या लढाईत दुसऱ्या पतंगांचे धक्के खाऊन खाऊन त्याचा कागद फाटून गेला. एका पतंगाच्या दोरीनें त्याची दोरीहि कातून टाकली. आकाशांत ताऱ्याप्रमाणें शोभणारा तो पतंग कोलांट्या खात, फडफडत, गिरक्या घेत घेत खालीं आला!

"अयाई! अगदीं बरोबर या बावडीप्रमाणं सरोजिनीची स्थिति झाली बरं."

विमलनें अचानक काढलेले हे उद्‌गार ऐकून मी विस्मयचकित होऊन तिच्याकडे बघूं लागलें, पण विमल कांहींच न बोलतां दूरवर बघत राहिली. तिच्या डोळ्यांना जणुं बाह्य देखावा मुळींच दिसत नसून तिच्या स्मृतिपटावर सरकणारा एखादा चित्रपटच दिसत होता.

मीं विमलला उत्सुकतेनें विचारलें, "विमल, कुणाबद्दल बोललीस तूं आतां?"

विचारतंद्रींतून भानावर येऊन विमलनें एक सुस्कारा सोडला व ती माझ्याकडे बघून उदासपणें हंसली. त्यामुळें माझी उत्सुकता अधिकच वाढली.

"सांग ना, विमल. कोण ही सरोजिनी? तिच्याबद्दल तुला इतकं वाईट वाटण्याचं कारण काय?"

"वाईट वाटावं असंच तिचं आयुष्य झालेलं आहे."

"पण त्याला कारण काय?" मीं विचारलें.

"कारण?" विमल पुन्हां एकदां खिन्नपणें हंसली. "आतां इतक्यांत ही बावडी आकाशांत भराऱ्या घेत होती, ती खालीं येण्याचं

काय कारण ? इतर पतंगांचे धक्के आणि काचांनीं धार आणलेली दुसऱ्या पतंगाची दोरी हेंच ना ? सरोजिनी श्रीमंत घराण्यांत जन्मलेली एकुलती एक मुलगी. बुद्धिमान्, शिकलेली, कलासंपन्न नी दिसण्यांत देखणी अशी आहे. तीहि या पतंगाप्रमाणं समाजांत डौलानं मिरवत होती. पण आज त्याच समाजांत ती निंद्य बिषय होऊन राहिली आहे. ''

" पण कां ? सांग कीं ग मला तिची सगळी हकीकत ? " मीं अधीरतेनें म्हटलें.

" बरं, सांगतें सर्वच तुला. अन् मग सरोजिनीला सद्यःस्थिति प्राप्त होण्याला कोण किंवा काय कारणं झालीं हें तुझं तूंच अजमावून बघ. "

विमलनें हळूहळू सांगण्यास सुरुवात केली–

" सातआठ वर्षं झालीं त्या हकीकतीला. सरोजिनी त्या वेळीं सोळा वर्षांची असून मॅट्रिकच्या वर्गात होती. त्या बेळीं सरोजचं आयुष्य म्हणजे नंदनवनांतल्या क्रीडेप्रमाणं परिपूर्ण होतं. निर्मल आनंदानं हंसावं, बागडावं, प्रेम करावं नी करून घ्यावं, असा तिचा दिनक्रम असे. सरोजची प्रेमा म्हणून एक मैत्रीण होती. सरोज आणि प्रेमा यांची मैत्री म्हणजे शाळेंतील मुलींना एक कौतुकाचा विषय झाली होती. दोघी नेहमीं बरोबर असायच्या. दोघींनींहि आपलीं गुपितं एकमेकींना सांगावीं असा त्यांचा नियम होता.

सरोजचा आणखी एक बालमित्र होता. लहानपणापासून दोघांच्या घराण्यांत घरोबा असल्यामुळं सरोज आणि श्रीकान्त हीं एकत्र खेळलीं-वाढलेलीं होतीं. सरोजची आई तिच्या लहानपणींच वारल्यामुळं श्रीकान्ताची आई तिला पोटच्या मुलीप्रमाणं वागवी.

लहानपणापासून म्हणजे पांचव्या सहाव्या वर्षापासूनच या दोघां बालमित्रांना लोकांनीं चिडवावं. सरोजला त्यांनीं विचारावं, ‘सरोज, तुला कोण नवरा हवा?’ कीं सरोजनं सांगावं ‘श्री.’ आणि श्रीकान्ताला विचारलं, तरी तो ‘सरोज बायको हवी’ म्हणूनच सांगे.

अजाणतां केलेल्या थट्टेमुळं असंच केवळ नसलं, तरी त्या मुलांच्या मनांत भावी नात्याचं कल्पनाबीज रुजत गेलं व तें या थट्टेमुळं प्रथम रुजलं असं म्हणण्यास कांहींच हरकत दिसत नाहीं.

दोन्ही मुलं हुषार असल्यामुळें भराभर परीक्षा पास होत गेलीं. श्रीकान्त इंटर पास होऊन बी. ए. च्या वर्गात गेला त्याच वेळीं सरोज मॅट्रिकमध्यें गेली.

श्रीकान्त व सरोज यांनीं ठरवून टाकलं होतं, कीं सरोज बी. ए. होते तोंवर श्रीनं एम्. ए. व्हावं. नंतर दोघांनीं लग्न करावं.

श्रीकान्ताला आजपर्यंत मुली सांगून आल्या होत्या, पण श्रीकान्ताचे वडील विश्वनाथराव यांनीं तिकडे लक्ष घातलं नाहीं. पण श्री इंटर झाल्याबरोबर जेव्हां त्यांनीं श्रीच्या लग्नाबद्दल बोलावयास व मुली पाहावयास सुरुवात केली, तेव्हां श्री व सरोज यांना किती आश्चर्य वाटलं असेल याची तूंच कल्पना कर वत्सले.”

विमल सांगत असलेली हकीकत ऐकत असतां आम्हीं दोघी इतर गोष्टी विसरूनच गेलों होतों. पतंग उडवणारीं मुलें केव्हांच निघून गेलीं असून सूर्य अस्ताला गेल्यामुळें पिवळसर प्रकाश पडला होता.

मी म्हटलें, “पण दुसऱ्या मुली कशाला पाहायला हव्या होत्या? सरोज होती ना?”

“श्रीकान्त आणि सरोज यांना तरी नवल वाटलं तें हेंच.

प्रत्यक्ष श्रीकान्तापर्यंत जोंवर गोष्टी आल्या नाहींत, तोंवर तो कांहीं बोलला नाहीं. अर्थात् सरोजजवळ तो आपली भीति बोलून दाखवीत असे; पण इतरांना तो कांहीं बोलला नव्हता. श्रीचे वडील म्हणजे जमदग्नीचा अवतार! होतां होईल तों त्यांच्या दृष्टी-पुढं ठरायचं नाहीं अशी लहानपणापासून मुलं काळजी घेत. श्रीकान्तानं एकदोनदां आईजवळ, 'मला लग्न करायचं नाहीं' वगैरे सांगून पाहिलं, पण विश्वनाथरावांपुढं पार्वतीबाईचं तरी कुठं काय चालत होतं!

पण एके दिवशीं जेव्हां विश्वनाथरावांनीं श्रीला समक्ष बोला-वून सांगितलं कीं, 'एक मुलगी तुझ्यासाठीं ठरवली आहे. पत्रिकेंत छत्तीस गुण जमत असून मुलगी सुंदर आहे व हुंडाकरणी यथास्थित मिळणार आहे, तूं औपचारिकपणं मुलगी बघून ये, म्हणजे मुहूर्त नक्की धरूं.' त्या वेळीं श्रीकान्तानं असेल नसेल तें अवसान अंगांत आणून सांगितलं कीं, 'मला सरोजशींच लग्न करायचं आहे' म्हणून.

विश्वनाथराव उपहासपूर्वक हंसून श्रीला म्हणाले, 'येवढं बी.ए.-च्या वर्गात आहां, पण करमरकर आणि गोखले यांचं एक गोत्र आहे येवढंहि समजत नाहीं का तुम्हांला? सगोत्र लग्न आपल्या धर्मानं निषिद्ध ठरवलेलं आहे. मुकाट्यानं मी सांगतों ती मुलगी बघून या, म्हणजे मुहूर्त ठरवूं.'

सगोत्रासंबंधीं ऐकतांच श्रीकान्त इतका गडबडला, कीं सरोज आणि आपण यांच्यामध्यें एखादी खोल खोल दरी उत्पन्न झाल्या-सारखं त्याला वाटलं. आपल्या खोलींत जाऊन तो तासभर कपाळाला हात लावून बसला. नंतर प्रथम तो सरोजकडे गेला. सरोजला सर्व हकीकत ऐकून धक्काच बसला! पण अपक्व बुद्धीमुळं ती

एकदम निराशा पदरांत घेईना. ती श्रीकान्ताला म्हणूं लागली, ' असेना का एक गोत्र ! त्याला काय झालं ! मी दादासाहेबांना सांगतें म्हणजे ते विश्वनाथकाकांची समजूत घालतील. '

श्री तिला सांगत होता, ' अग, त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. ' पण सरोज ऐकेना ! शेवटीं ती म्हणाली, 'आपण रजिस्टर लग्न करूं. '

' खरंच कीं, सरोज, हा उपाय मला कसा नाहीं सुचला ? ' आपणां दोघांमध्यें उत्पन्न झालेल्या दरीवर हा जणुं पूल तयार झाल्याप्रमाणं श्रीला वाटलं. पण दुसऱ्याच क्षणीं त्या पुलाचा चक्काचूर उडाला ! ' पण सरोज, तुझं वय फारच लहान आहे. दादासाहेबांच्या संमतीशिवाय तुला रजिस्टर लग्न करतांच येत नाहीं.'

' सोळा वर्षं नाहीं पुरत ? '

' छे: छे: ! अठरा वर्षं पूर्ण व्हावीं लागतात. '

' मी दादासाहेबांना सांगतें. त्यांची संमति असली म्हणजे झालं कीं नाहीं ? ' सरोजनं पुन्हां आशा निर्माण केली.

तितक्यांत सरोजची मैत्रीण प्रेमा ही आली. सर्व हकीकत सांगून झाल्यावर प्रेमा सरोजला म्हणाली,

' पण, सरोज, तूंच परगोत्रांत दत्तक गेलीस तर ? किंवा श्रीच दत्तक गेला तर ? '

' खरंच हाहि एक उपाय आहे बरं का. ' श्री व सरोज आनंदानं हुरळून गेलीं. त्यांच्या आनंदांत प्रेमाहि वांटेकरीण होतीच. तिघांनींहि नंतर खूपखूप गप्पा मारल्या व चहाफराळ केला. नंतर श्रीकान्त निघून गेला.

सरोजनं प्रेमाला मुद्दाम बसवून घेतलं. ' दादासाहेबांशीं या

विषयावर बोलतांना मला कसंसंच होईल, तेव्हां तूंच त्यांच्याशीं बोल ' असा ती प्रेमाला आग्रह करीत होती. पण प्रेमानं तिला सांगितलं कीं, 'मी विषयाला सुरुवात करून देईन. पुढं आपली तुझी तूंच बोल. '

दादासाहेब फिरून येऊन दिवाणखान्यांतील खुंटीवर अंगरखा, उपरणें, पगडी वगैरे काढून ठेवून, बिछायतीवरील लोडाशीं कुटलेला विडा खातखात जरा कुठं हाशहुश करतात तोंच सरोज प्रेमाला घेऊन तेथें गेली. दादासाहेबांच्याजवळ बसून त्यांच्या करांगुलींतील नवरत्नांच्या पवित्रकाशीं खेळत खेळत सरोजनें ' दादासाहेब ' म्हणून लाडिकपणें हांक मारली. "

" वत्सले–" विमल मला म्हणाली, " सरोज आपल्या वडिलांना हांक मारीत असे ती तिची पद्धत किती गोड होती म्हणून सांगूं ! तिच्या मुद्रेवर व स्वरांत पितृप्रेम, श्रद्धा हीं जशीं असत, त्याचप्रमाणें अल्लडपणाहि असे. दादासाहेब दमूनभागून गेलेले होते; पण सरोजची ती हांक ऐकतांच सर्व श्रमपरिहार झाल्याप्रमाणं त्यांच्या चेहऱ्यावर तजेला आला. पत्नी गेल्यापासून सरोज म्हणजे त्यांचं सुखसर्वस्व झालेली होती.

सरोजची हांक ऐकून दादासाहेब हंसूं लागले. उजव्या हाताचें पुढलें बोट नाकासमोर हालवीत ते थट्टेनें म्हणाले, ' इतकी लाडीगोडी चालली आहे ! कांहींतरी मागायचंय् तुला. खरं ना पण ! '

सरोज खुद्कन् हंसली आणि जवळच बसलेल्या प्रेमाकडे बघूं लागली. त्या बघण्याचा अर्थ लक्षांत येऊन प्रेमा म्हणाली, ' दादासाहेब, आतां श्री आला होता.'

दादासाहेब खो खो करून हंसले.

'मग रोजच येतो तो; त्यांत बातमी ती काय आहे? आणि तें सांगायला ही प्रेमा कशाला ग तुला? हं हं, आतां आलं लक्षांत! पण आतां परीक्षा आटपेपर्यंत नाटकसिनेमा बंद हं. तीन महिन्यांवर आली ना परीक्षा? प्रेमा, तुला पण बरं कां?'

एरवीं वागतांना दादासाहेब आपल्या मुलींत आणि प्रेमांत फरक करीतच नसत.

आतां पुढें काय बोलावें हें प्रेमाला सुचेना. तेव्हां सरोजनेंच मनाचा निश्चय केला. 'विश्वनाथकाका श्रीचं लग्न जमवताहेत.'

'ही आनंदाची बातमी सांगण्यासाठीं श्री आला होता होय?' दादासाहेब उल्हास दर्शवून म्हणाले. 'छान छान! मग तुझ्या मनांत नव्या वहिनीला आहेर म्हणून एखादा दागिना घडवायचा आहे कीं काय? कीं लग्नांत मिरवण्यासाठीं तुलाच एखादा शालू घ्यायचा आहे? बाकी दोन्ही गोष्टी आवश्यकच आहेत म्हणा.'

सरोज हंसली नाहीं. दादासाहेबांच्या बोलण्यानें तिच्या हृदयाला वेदना झाल्या. आपल्याच पायांच्या बोटांकडे बघत ती विचारमग्न झाली. तिची मनःस्थिति प्रेमाच्या लक्षांत आली होती. तीच दादासाहेबांना म्हणाली, 'तसं नव्हे, दादासाहेब, विश्वनाथकाकांनीं ठरवलेल्या मुलीशीं श्रीला लग्नच करायचं नाहीं.'

कांहींतरी विशेष आहेसें वाटून दादासाहेब गंभीर झाले. त्यांनीं प्रश्न केला, 'कां? मुलगी सुरेख नाहीं कीं काय?'

'मुलगी सुरेख आहे म्हणे...' प्रेमानेंच उत्तर दिलें. 'पत्रिकेंत छत्तीस गुण जमताहेत. हुंडा भरभक्कम, हौसेमौजेची करणी, सगळं कांहीं ठीक आहे. पण श्रीला त्या मुलीशीं लग्नच करायचं नाहीं!'

दादासाहेब गंभीरपणानें मान हालवीत तंबाकू जोरानें चघळूं लागले. ‘ श्रीचं म्हणणं तरी काय आहे ? ’

सरोज आणि प्रेमा दोघीहि घुटमळल्या ! त्या बोलत नाहींतसें पाहून दादासाहेबांनीं पुन्हां विचारलें, ‘ अं ? काय आडकाठी आहे श्रीची ? ’

सरोजनें प्रेमाकडे विनवणीच्या दृष्टीनें पाहिलें. तेव्हां धीर धरून प्रेमानें सांगितलें, ‘ श्रीच्या मनांत सरोजशींच लग्न करायचं आहे. ’

दादासाहेबांच्या कपाळाला आंठ्या पडल्या. दादासाहेब जितके प्रेमळ तितकेच तापट होते. त्यांनीं तीव्र स्वरांत विचारलें,

‘ अस्सं ! आणि आमच्या सरोजच्या मनांत काय आहे ? ’

सरोज आणि प्रेमा दोघीहि बोलण्याला भीत होत्या; पण शेवटीं मैत्रिणीच्या प्रेमाखातर प्रेमानेंच सांगितलें, ‘ तिच्याहि मनांत तसंच आहे. ’

‘ पण दोघांच्याहि मनांत असलं तरी हें सगोत्र लग्न होणार कसं ? ’

सरोजचें लग्न ठरविणें हा आपला अधिकार, असें समजणारे दादासाहेब सरोजच्या या इच्छेमुळें अपमानित झाले होते.

सरोजनें आतां आपलें सर्व धैर्य एकवटलें व म्हटलें,

‘ पण, दादासाहेब, सर्वच मंडळी लहानपणापासून आम्हां दोघांना चिडवीत नसत का ? आमचं नातं तुम्हीं सर्वांनीं ठरवून टाकल्यासारखं केलं नव्हतं का ? मग आम्हांला आतां तसंच वाटतं, यांत गैर काय आहे ? ’

‘ सगोत्राची भानगड नसती तर तुमचं लग्न होण्यांत गैर कांहींच नव्हतं. आम्हीं वडील मंडळींनीं तुम्हीं न सांगतांच तुमचं

लग्न करून टाकलं असतं. आणि तुमची कांहींतरी केलेली चेष्टा तुम्ही पोरं खरी मानाल ही तरी कुणाला काय कल्पना!'

न्यायाधिशानें शेवटचा निकाल सांगावा तसे दादासाहेब बोलले. पण सरोजनें हट्ट करण्यास सुरुवात केली. ती जवळजवळ रडण्याच्या बेताला आली होती.

'दादासाहेब, तुम्ही मला परगोत्रांत दत्तक दिलीत तर सगोत्राची भानगड नाहींशी होईल.'

एकदम जिव्हारीं घाव घातल्याप्रमाणें दादासाहेबांचा चेहरा पांढरा पडला! 'तूं माझी एकुलती एक मुलगी, तुला मी दत्तक देऊं? अन् तुझ्या सुखासाठीं जतन केलेली सगळी संपत्ति जमीन-जुमला भाऊबंदांच्या घशांत घालूं? आणि लग्नसंबंधांत दत्तविधान करून गोत्र बदलणं हा निवळ फार्स आहे. अगदीं धर्मनिषिद्ध आहे तो व्यवहार. माझ्या मुलीचं लग्न मी अशा प्रकारें कधींहि करणार नाहीं. श्रीपेक्षां शंभर पट उत्तम नवरा तुला मिळवून देण्याची माझी धमक आहे आणि तुझेहि गुण तसेच आहेत. मग या असल्या भानगडी मी काय म्हणून करूं?'

सरोज रडूं लागली. दादासाहेबांनीं बाजूला तोंड वळवून धोतराच्या सोग्यानें चटकन् डोळे टिपले.

प्रेमाला राहवेना. ती म्हणाली, 'तुम्ही संमति दिली तर या दोघांचं रजिस्टर लग्न होईल. मग गोत्राबित्राची कांहीं भानगडच राहत नाहीं.'

दादासाहेब चिडले. ते संतापून बोलले, 'आमच्या घराण्यांत आजपर्यंत असले धर्मभ्रष्ट व्यवहार झालेले नाहींत आणि मी जिवंत आहें तोंवर ते होऊंहि देणार नाहीं.'

सरोज हुंदके देत देत केविलवाण्या स्वरांत म्हणाली, 'दादासाहेब, माझ्या सुखासाठीं तुम्ही नाहीं कां हो कांहीं करणार?'

दादासाहेब करारीपणानें बोलले, 'या बाबतींत मी कांहींएक करणार नाहीं. असलं हें धर्मभ्रष्ट कुळभ्रष्ट होऊन मिळणारं सुख तुला नाहीं मिळालं तरी चालेल. अन् उद्यांपासून त्या श्रीशीं भाषणसुद्धां करतां कामा नये. आपल्या घरांत त्यानं पाऊल टाकतां कामा नये. मग येईल तुमचं दोघांचं डोकं ताळ्यावर.'

'दादासाहेब' सरोजनें हृदयद्रावकपणानें हांक मारली. पण दादासाहेब तिरसटपणानें म्हणाले, 'एकदां नाहीं म्हणजे नाहीं! जास्त बोलण्याची जरूरच नाहीं. आणि पुन्हां केव्हांहि हा विषय माझ्याजवळ कुणीं काढतां कामा नये!'

प्रेमानें सरोजला तिच्या खोलींत नेलें. सरोजची समजूत घालतां घालतां शेवटीं प्रेमाहि रडूं लागली.

जरा वेळानें दोघी शांत झाल्यावर प्रेमा आपल्या घरीं गेली. प्रेमाचे वडील विश्वनाथरावांच्याकडे जाऊन श्रीला दत्तक देण्याबद्दल त्यांचें मन वळवूं लागले, पण अपमान पदरांत घेऊन ते परतले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं प्रेमा येऊन बघते तों सरोजचे डोळे रडून रडून लाल झाले होते आणि सुजले होते. रात्रीं ती जेवली नव्हती आणि तिला झोंपहि आलेली नव्हती. पलंगावर रात्रभर ती तळमळत पडली होती.

प्रेमाच्या आग्रहावरून सरोजनें चहाबिस्किटें खाल्लीं. नंतर दोघी मैत्रिणी हितगुज करीत बसल्या. हळूहळू सरोजची मनःस्थिति उल्हसित होऊं लागली. रात्रीं जीव देण्याबद्दल विचार करणारी सरोज आशांकित होऊन म्हणाली, 'प्रेमा, माझं आणि श्रीचं खरंखरं प्रेम

आहे. परमेश्वर विनाकारण आमची ताटातूट करून आम्हांला दुःखाच्या खाईत खाचित लोटणार नाहीं. तो कांहींतरी करून आमचं लग्न घडवून आणील.'"

इतकें सांगून विमल जरा थांबली व हळूहळू अंधकारव्याप्त होणाऱ्या सभोंवतालच्या देखाव्याकडे तिनें नजर टाकली. दुःखभारानें एक निःश्वास टाकून ती पुढें बोलूं लागली,

"वत्सले, सूर्यप्रकाशाप्रमाणं सरोजच्या मनांत उगवलेली ही आशा लवकरच नष्ट होऊन तिथं निराशेचा निबिड अंधार पसरायचा होता.

शाळेशिवाय इतर कुठें जाण्याची दादासाहेबांनीं सरोजला बंदीच केली. श्रीलाहि आपलें घर त्यांनीं बंद केलें आणि श्रीच्या वडिलांशींहि ते मुलाच्या हितानहितासंबंधीं बरेच बोलून आले.

काय करावें तेंच श्रीला समजेना. विश्वनाथरावांनीं श्रीचें लग्न ठरवून टाकलें. त्यानें वडिलांना पुष्कळ सांगून पाहिलें, 'मी बायकोला वागवणार नाहीं,' असेंहि शेवटीं सांगितलें; पण त्याच्या बोलण्याला कवडीची किंमतहि कोणीं दिली नाहीं.

केवळ वडिलांची अरेरावी आणि घराबाहेर घालवून देण्याची धमकी व आईचे अश्रू यांमुळेंच श्री लग्नाला उभा राहिला. श्रीचें लग्न थाटामाटानें झालें. श्री सर्व विधि खिन्नपणें करीत होता. त्याचे डोळे नववधूकडे न वळतां सरोजला शोधीत होते. पण सरोज लग्नाला गेली नाहीं.

प्रेमा आणि तिची आई यांनीं सरोजला त्या दिवशीं आपल्या घरीं नेलें होतें. दुःखावेगानें सरोजला वेड लागेल कीं काय, अशी त्या दोघींना भीति वाटत होती.

त्या दिवसानंतर सरोजच्या स्वभावांत भयंकर बदल झाला. सुखलहरींबरोबर नाचणारें तिचें हृदय दुःखभारानें जणुं निश्चेष्ट होऊन गेलें.

आपलें वागणें अगदीं यथायोग्य झालें अशी दादासाहेबांची पूर्ण खात्री होती. पण मुलीचें दुःख त्यांना बघवेना. एका वर्षातच सरोजला एकटी सोडून त्यांनीं परलोकीं प्रयाण केलें.

सरोजचे चुलते काकासाहेब हे सरोजचे पालक ठरले. आपल्या मुलांबाळांसह ते सरोजच्या घरांतच येऊन राहिले. त्यांनीं सरोजवर अंमल गाजवण्याचें धोरण न स्वीकारतां तिच्या मर्जीला येईल तसें तिला वागूं दिलें.

यामुळें सरोजला खूष ठेवून, लोकांकडून वाहवा मिळवून काका-साहेबांना तिच्या संपत्तीचा अपहार करतां येऊं लागला.

सरोजनें पैशाची फिकीर कधींच केली नाहीं. मिळालेल्या स्वातं-त्र्याचा उपभोग तिनें पूर्णपणें करण्यास सुरुवात केली. सरोज आतां कॉलेजांत इंटरच्या वर्गांत होती. श्री त्याच कॉलेजांत एम्. ए. च्या टर्म्स् भरीत होता. आतां पहिल्याप्रमाणेंच दोघांचें हिंडणेंफिरणें, गप्पा, करमणुकीचे कार्यक्रम वगैरे चालू झाले.

श्रीनें आधीं बोलल्याप्रमाणें आपल्या पत्नीला नांवाखेरीज पत्नी-पदाचा कोणताहि अधिकार दिलेला नव्हता. विश्वनाथरावांनीं पुष्कळ लोकांकडून त्याला उपदेशाची मात्रा दिली; पण ती मुळींच लागू पडली नाहीं. यामुळें विश्वनाथराव त्याच्यावर चिडलेच होते. त्यांत त्या दोघांच्या पुन्हां पालवलेल्या मैत्रीच्या बातम्या ऐकून ते कमालीचे संतापले! त्यांनीं आतां एक नवीनच उपाययोजना केली. ते सरळ सरोजला जाऊन भेटले.

विश्वानाथरावांनीं तिला सांगितलें, ' तूंच आतां श्रीला ताळ्या-वर आण. तुझ्यामुळं दुसऱ्या एका मुलीच्या संसाराची आणि श्रीच्याहि सुखाची राखरांगोळी होते आहे. '

प्रेमाच्या वडिलांना भेटूनहि विश्वनाथरावांनीं त्यांना सरोज आणि श्री यांना उपदेश करण्यास सांगितलें.

पण प्रेमाच्या वडिलांनीं विश्वनाथरावांचीच हजेरी घेण्यास सुरु-वात केली; तेव्हां ते सर्वांना अद्वातद्वा शिव्या देत चालते झाले.

पण विश्वनाथरावांनीं श्रीच्या पत्नीचें शब्दचित्र काढलेलें पाहून सरोजचें मन कळवळलें. ती श्रीला सांगूं लागली,

' श्री, आपलं दोघांचं प्रेम आपल्याला, त्याचप्रमाणं आपल्या-भोंवतालच्या सर्वांना दुःख देत आहे. त्यापेक्षां श्री, तूं मला विसरून जाऊन तुझा तूं संसार कर ना. तुझ्या बायकोला बिचारीला सर्व जन्म दुःखांत काढायला आपण कां बरं लावावं ? तिला सुख देणं हेंच तुझं कर्तव्य आहे. '

आश्चर्यानें निःशब्द होऊन श्रीनें हें बोलणें ऐकून घेतलें. तो नंतर उपरोधिकपणें हंसून म्हणाला, ' असं अडूनअडून सांगण्या-पेक्षां तुझं माझ्यावरलं प्रेम नाहींसं झालं असं स्पष्ट सांगेनास ? माझं कर्तव्य मला समजावण्याचा बहाणा कशाला ! '

सरोजच्या हृदयावर या बोलण्यानें आघातच झाला. तिनें विश्वनाथराव येऊन गेल्याची हकीकत श्रीला सांगितली. त्यामुळें तो इतका संतापला कीं त्या भरांत घरीं जाऊन स्पष्ट शब्दांत त्यानें वडिलांच्या चुकीचें माप त्यांच्या पदरांत घालण्यास सुरुवात केली. त्याचा परिणाम येवढाच झाला कीं, बापलेकांची खडाजंगी होऊन

श्री नेसत्या वस्त्रानिशीं व मातेच्या अश्रूंच्या दुःखद स्मृतीनिशीं घरा-बाहेर पडला.

श्रीनें नोकरी लागेपर्यंत काय करावें हा प्रश्नच होता. सरोजनें ‘ त्याला कांहीं दिवस आपल्या घरीं राहूं द्या,’ असें काकासाहेबांना म्हटलें. त्यांनीं तें साफ नाकारलें. इतकेंच नव्हे, तर श्रीला पैसे देण्याचेंहि नाकारलें. घराण्याचा लौकिक संभाळण्यासाठीं त्यांनीं विश्वनाथरावांच्या सल्ल्याप्रमाणें सरोजवर करडा अंमल गाजवून श्रीला भेटण्याची बंदी केली, तेव्हां सरोजला तें असह्य झालें. प्रेमाच्या वडिलांच्या साहाय्यानें तिनें आपली इस्टेट काकासाहेबांच्या-कडून काढून स्वतः ताब्यांत घेतली आणि काकासाहेबांना मुलांबाळांसह घरांतून जावयास सांगितलें.

घराबाहेर पडल्यावर काकासाहेबांनीं अर्थातच सरोजबद्दल नाहीं नाहीं तें बोलावयास सुरुवात केली. विश्वनाथराव त्यांच्या मदतीला होतेच. त्यामुळें सरोजबद्दल लोकमत दूषित झालें.

सरोजचें आनंदी अन् प्रेमळ मन हळूहळू कठोर बनत चाललें होतें. श्री आणि प्रेमा व तिची मंडळी ह्यांखेरीजकरून ती बहु-तेकांशीं बेपर्वाईनें वागूं लागली. त्यामुळें तर लोक अधिकच वाईट बोलूं लागले.

प्रेमाच्या वडिलांनीं श्रीला पन्नास रुपयांची नोकरी मिळवून दिली. एक लहानशी जागा घेऊन तो तिथें राहत होता.

सरोज आणि प्रेमा दोघी सीनियर बी. ए.मध्यें होत्या. काका-साहेब वेगळे होऊन वर्ष झालें होतें. या काळांत ते एकदांहि पुतणीला भेटले नव्हते.

आणि म्हणूनच एक दिवस ते जेव्हां अचानक रीतीनें सरोजकडे आले, तेव्हां तिला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें! पण त्याहूनहि अधिक आश्चर्य त्यांच्या वागण्याचें तिला वाटलें. कारण आल्यावर काकासाहेब जे खालीं मान घालून दुःखी मुद्रा करून बसले ते मुळीं कांहीं बोलेनातच !

शेवटीं सरोजनें घाबरून विचारलें, 'काकासाहेब, झालंय तरी काय असं ? सर्व मंडळी खुशाल आहेत ना ?'

काकासाहेबांनीं दुःखाचा एक सुस्कारा सोडला. 'सरोज, माझीं माणसं सगळीं खुशाल आहेत; पण मला वाईट वाटतं तें तुझ्याबद्दल. तूं मला दूर लोटलंस; पण माझ्या आंतड्याला पीळ पडतो आहे. कसं झालं तरी आपलं घराणं एक आहे. आपल्या घराण्याची अब्रू संभाळणं हें माझं कर्तव्य आहे. म्हणूनच माना-पमान गुंडाळून मी तुला सांगायला आलों आहें कीं, तुला लागेल ती मदत करायला मी तयार आहें.'

सरोजला या बोलण्याचा अर्थच समजेना ! 'काकासाहेब, हें तुम्हीं म्हणतांहां तरी काय ? मदत कसली ?'

काकासाहेब उदासवाणें हंसून म्हणाले, 'हें बघ, सरोज, मला सगळं माहीत झालं आहे. गांवांतली कुजबुज वाढली नाहीं तोंच ती नष्ट करण्याचे उपाय योजणं बरं नव्हे का ?'

सरोजच्या डोक्यांत आतां लख्ख प्रकाश पडला. ती संतापून बोलली, 'काकासाहेब, काय बोलतां हें तुम्ही ? लोक वाटेल तें बोलले म्हणजे तुम्हींहि वाटेल तें बोलावं ? तुम्हांला माझा स्वभाव माहीत नाहीं काय ?'

काकासाहेबांनीं अविश्वासपूर्वक मुद्रा केली. तिरस्कारानें हंसत ते म्हणाले, ' बरं, जातों मी. अजून डोळे उघडले नसले तरी लवकरच उघडतील, तेव्हां मला बोलाव. तुझ्याकरितां नव्हे तर घराण्याच्या अब्रूकरितां मी मदत करीन. म्हणत असलीस तर लग्नाची खटपट करतों. अशा परिस्थितींत स्थळ जरा कमी प्रतीचं मिळेल, पण त्याला काय उपाय ? श्रीशीं तुझं लग्न शक्यच नाहीं मुळीं. वैदिक पद्धतीनं सगोत्रामुळं नाहीं आणि श्रीची बायको असल्यामुळं रजि-स्टर्ड लग्नहि होत नाहीं. '

' माहीत आहे मला हें सगळं आणि यापुढें मी तुम्हांला मेलें असं समजा. ' इतकें बोलून सरोज दिवाणखान्यांतून तडक निघून गेली.

काकासाहेबहि गेले; पण सरोजच्या हृदयांत जहर ओतून गेले !—

सरोज आपल्या खोलींत जाते तों प्रेमा काकासाहेब आल्याचें नोकरांकडून ऐकून आश्चर्य करीत बसली होती. तिला सरोजनें सर्व हकीकत सांगितली. सरोज कितीक वेळां तरी प्रेमाच्या खांद्यावर मान टाकून रडलेली होती; पण आज ती रडली नाहीं. तिच्या मनांत विद्युत्चक्राच्या गतीनें विचार चालू होते. आणि त्या गती-मुळें निर्माण झालेलें तेज तिच्या नेत्रांत चमकत होतें. तें विलक्षण तेज बघून प्रेमाला कसेसेंच झालें.

' आपण झालेला प्रकार बाबांना सांगूं; तूं आमच्या घरीं चल. ' असें प्रेमा सरोजला म्हणाली.

पण सरोजनें ' आतां मी येत नाहीं, जरा पडून राहतें. तूंच बाबासाहेबांना सगळं सांग.' असें सांगितल्यामुळें प्रेमाचा नाइलाज झाला.

प्रेमानें घरीं जाऊन आईवडिलांना व आलेल्या श्रीलाहि सर्व हकीकत सांगितली. त्या वेळीं हळहळून प्रेमाचे वडील म्हणाले, 'काय या आमच्या विलक्षण धर्मकल्पना! हजारों वर्षांपूर्वी, ऋषींच्या वंशावलि निर्माण होऊन लग्नसंबंधांच्या सोयीसाठीं गोत्रं ठरवून योग्य-अयोग्य गोत्रसंबंध ठरवण्यांत आले. योग्य ठरलेल्या गोत्रागोत्रांत पिढ्यान्‌पिढ्या लग्नं होऊन इतका रक्तसंकर झालेला आहे कीं, गुणविकासाला वाव मिळेनासा होऊन शरीरदौर्बल्य नी दुर्गुण यांची मात्र वाढ होत आहे. पण इतका विचार करतो कोण? जुनं तें सोनं! रूढि म्हणजेच आमचा धर्म! त्याला कांहीं अर्थ नसेना का!'

श्री लगेच सरोजकडे आला. श्रीकडे पाहिल्याबरोबरच सरोजनें विचारलें,

'कळली वाटतं सगळी हकीकत?'

'हो, आतांच प्रेमानं सांगितली.'

कितीतरी वेळ दोघें स्तब्धच होतीं.

नंतर श्री म्हणाला, 'सरोज, समाजबंधनं पाळण्यासाठीं आपण केवढंतरी भयंकर दिव्य करतों आहों, नाहीं? आपला समाज इतक्या योग्यतेचा आहे का? आपलं हें दिव्य म्हणजे आपल्या नीतिधैर्याची साक्ष आहे कीं भेकडपणाची?'

'आपल्या भेकडपणाची!' सरोजच्या स्वरांत शांतपणा असला तरी नेत्रांत जळजळीतपणा होता. 'असल्या समाजाच्या काळजावर घाव घालणं हेंच नीतिधैर्य समजलं पाहिजे.'

'सरोज—' श्रीनें विव्हलतेनें हांक मारली. ती हांक सरोजच्या

अंतर्हृदयांत शिरली. इतका वेळ सांठून राहिलेला अश्रुपूर झरझरां वाहूं लागला.

'सरोज--' जवळ येऊन श्रीनें प्रेमविव्हलतेनें म्हटलें. तिच्या खांद्यावर त्यानें हळूच हात ठेवला. नी मग त्याला राहवेना. आपलें दोघांचें लग्न होणें अशक्य, हें समजल्यापासून श्रीनें होतां होईल तों सरोजला स्पर्शसुद्धां केला नव्हता. पण आज त्याचें प्रेम हृदयांत मावेना. हातांत तोंड लपवून हुंदके देणाऱ्या सरोजला त्यानें बाहुपाशांत बद्ध करून तिचें चुंबन घेतलें.

पाऊस पडत असतां उन्ह पडलें म्हणजे अत्यंत हृद्य दृश्य दिसतें. अश्रूंनीं भिजलेल्या मुखावर सरोजचा जो प्रेमानंद उमटला होता, तें दृश्य श्रीलाहि हृदयंगम वाटलें."

* * *

"म्हणूनच, वत्सले, सरोज नी श्री समाजाच्या दृष्टीनें निंद्य ठरलीं आहेत." वरील हकीकत सांगून विमल म्हणाली.

"अरेरे!" माझ्या तोंडून उद्गार बाहेर पडला. "पण विमल, तुला ही सगळी खरी हकीकत कशी समजली? सरोजशीं किंवा प्रेमाशीं तुझी फार मैत्री असली पाहिजे."

विमल हंसली.

"कां तूं म्हणजेच प्रेमा?" मीं चेष्टेनें विचारलें. तरीहि विमल नुसतीच हंसली. नंतर एकदम उठून उभी राहून ती म्हणाली, "अगबाई, किती काळोख झाला!"

आम्ही निःशब्दपणें खालीं उतरलों. माझे विचार चालूं होते--

'श्री, त्याची पत्नी आणि सरोज या तिघांनीं आपल्याला

दुःखाच्या खाईत लोटल्याबद्दल कुणाला जाब विचारायचा ? धर्माला ? रूढीला ? समाजाला ? वडील मंडळींना ? कीं कायद्याला ? आकाशांत उडणाऱ्या बावडीला कातून टाकणारे हे निर्दय काचेरी दोरेच खरे ! श्री आणि सरोज यांच्या प्रेमाला विवाहमांगल्यानं पुनीत करण्यांत समाजाचं नुकसान झालं असतं काय ? बावडीप्रमाणं सरोजला स्थानभ्रष्ट करण्यानं समाजाचं काय बरं हित झालं ! ’

---

# योगायोग कीं दैवी घटना ?

एकोणीसशें ×× सालीं हिंदुमुसलमानांमध्यें भयंकर तेढ माजून राहिली होती. तिचा उगम एका अतिशय क्षुल्लक गोष्टींत झाला होता—अर्थात् पुढें त्याचा जो परिणाम झाला त्या मानानें क्षुल्लक. मराठे जातीची एक बारा-तेरा वर्षांची मुलगी नदीवरून धुणीं धुऊन येत असतां, दोन मुसल्मान टारगट पोरें तिचीं धुणीं हिसकावून घेऊन फाजिलपणा करूं लागलीं. त्याबरोबर ती मुलगी ओरडली. तिचें ओरडणें ऐकून दोनतीन ब्राह्मण तरुण धांवत आले आणि त्यांनीं त्या मुलीची सुटका करून त्या पोरांना बेदम मार दिला. मार कशाबद्दल दिला हें लक्षांत न घेतां आपल्या जातीच्या मुलांना हिंदूंनीं मारलें, एवढ्याबरच भर देऊन मुसलमान लोक खवळले होते. अर्थात् त्यांच्यांतील कांहीं समंजस लोक त्यांना शांत करण्याचा प्रयत्न करीतच होते; परंतु त्याचा कांहीं उपयोग न होतां त्या

गुंड लोकांनीं पुंडाई सुरू केली होती. एका लहानशा खेडेगांवांत दोन मुसलमान टारगटांनीं काढलेल्या कुरापतीचा परिणाम इतर कित्येक गांवांतून प्रतिध्वनित होऊं लागला. हिंदूंच्या देवालयांत अपवित्र पदार्थ पडूं लागले. मुसलमानांनीं कुरापती काढल्यामुळें कुठेंकुठें मारामाऱ्या होऊं लागल्या. पोलिस मारामारीच्या जागीं येत असल्याची वर्दी आली कीं मुसलमान गुंड पळून जात, आणि हिंदु तेवढे नेमके पोलिसांच्या हातीं सांपडून त्यांना दंड किंवा कैदेची शिक्षा भोगावी लागे. एकट्यादुकट्या बायकोला तर कुठें बाहेर जाण्याची सोयच नव्हती. एकदोन देवळांतील मूर्ति फोडण्याचादेखील प्रयत्न झाला होता, त्यामुळें हिंदु लोक मोठे त्रासून गेले होते.

याच सुमारास खालील गोष्ट घडून आली.

* * *

× ×पूर हें साधारण शहरवजा गांव असून, सामाजिक व राजकीय चळवळींत नांवाजलेले दहापांच पुढारीहि तेथें होते. सध्यां चाललेल्या मुसलमानी अत्याचारांचा निषेध, आणि तुरुंगांत गेलेल्या हिंदूंचें अभिनंदन करण्याकरितां एक जंगी जाहीर सभा भरविण्याचें त्यांनीं ठरविलें.

इतके दिवस त्या गांवांत मुसलमानांनीं अशी प्रत्यक्ष कांहींच गडबड केलेली नव्हती; परंतु या सभेनंतर गांवांतील मूठभर मुसलमान गुंडांच्या अंगांत वारें शिरलें. सभेंत ज्या पुढाऱ्यांनीं निषेधपर भाषणें केलेलीं होतीं, त्यांच्या घरासमोर उभें राहून ते गुंड अद्वातद्वा बडबडत व धमक्या घालीत. इतकेंच करून ते थांबले नाहींत, तर त्यांनीं त्या घरांत दगड व जोडेहि टाकले.

सभेंत बोललेले एक गृहस्थ बाहेर गेले असतां एकदोघां मुसलमानांनीं त्यांना मारलें; परंतु तितक्यांत पोलिस येऊन त्यांनीं त्या गुंडांना हातकड्या घातल्या; तसेंच पुढाऱ्यांच्या घरांसमोर हिंडणाऱ्या गुंडांनाहि ताकीद देऊन हांकून लावलें.

याच गुंडांमध्यें उस्मान सामील झालेला होता. हिंदूंना त्रास देण्यांत त्यानें बराच पुढाकार घेतलेला होता. इस्लाम म्हणजे जगांतील सर्वश्रेष्ठ धर्म असून सर्व जगानें त्या एकाच धर्माचा स्वीकार केल्यास बहार उडेल, असे विचार उस्मानच्या डोक्यांत कित्येक वेळां येऊन गेलेले होते; पण तितकें नाहीं तर नाहीं, निदान हिंदुस्थानांत तरी मुसलमानांखेरीज दुसरा मनुष्य दिसूं नये अशी इच्छा त्यानें आपल्या लहानशा डोक्यांत कित्येक वेळां घोळविली होती. आणि त्या कामांतच आपण आयुष्य वेंचावयाचें असाहि उस्माननें ठाम निश्चय ठरविला होता.

सभेनंतरचाच दिवस असून संध्याकाळ होऊन गेली होती. गांवाबाहेर एका लहानशा टेकडीवर मारुतीचें देवालय होतें. त्या टेकडीच्या पायथ्याशीं आंब्याच्या झाडाखालीं उस्मान आपल्या तालमींतल्या एका मित्राशीं बराच वेळ कांहींतरी कुजबूज करीत उभा होता; पण त्या बोलण्याचें पर्यवसान हळूंहळूं बाचाबाचींत होऊं लागलें. उस्मान खूपच चिडून बोलत होता आणि करीम-भाई विजयसूचक स्वरांत बोलून आणि हंसून उस्मानला अधिकच चीड आणीत होता.

उस्माननें कांहींतरी कामांत करीमची मदत मागितली असतां प्रथम ' हो हो ' म्हणून करीमनें उस्मानच्या मनांतली गोष्ट काढून घेतली, आणि मागून त्यानें एकदम आपलें स्वरूप पालटलें.

"मी तर तुला मदत करणार नाहींच; परंतु तूं तें काम केलेंस तर मी तुझें कृत्य उघडकीला आणून तुला जबर शिक्षा देववीन. तेव्हां मुकाट्यानें माझी मूठ दाबलीस तर ठीक आहे, नाहीं तर याद राखून रहा." असें करीमनें स्पष्ट सांगून टाकलें.

उस्मान चपापला; पण त्यानें हें बोलणें आधीं थट्टेवारींच नेण्याचा प्रयत्न केला. करीमनें त्याला मुळींच दाद दिली नाहीं आणि आपलें म्हणणें दुप्पट जोरांत पुढें मांडलें.

उस्मान मोठ्या पेंचांत पडला; मनांत ठरवलेला बेत मुळींच सोडून द्यावा तर आपण करीमला भितों असें होईल. शिवाय तें काम करण्याविषयीं उस्मानचा इतका ठाम निश्चय झालेला होता कीं, तें केल्याखेरीज त्याला चैन पडलें नसतें. उस्मानच्या दृष्टीनें तें एक अत्यंत पवित्र कर्तव्य होतें. आणि करीम मुसलमान असून त्या कृत्यांत त्याला मदत करण्याचें सोडून उलट त्याला मोडता घालीत होता !

"बरें, मी आपला बेत सोडूनच देतों, म्हणजे मग तुझा काय फायदा होतो तें तुझ्याच नीट ध्यानांत येईल. ये बी गई और वो बी गई, अशी तुझी गत होईल." असें बोलल्यावर तरी करीम वळेल अशा आशेनें उस्मान जरा दम देत बोलला.

करीम तिरस्कारदर्शक हंसून म्हणाला, "पहा बुवा, आतां इतका वेळ 'पवित्र कर्तव्य, पवित्र कर्तव्य' म्हणून तूंच म्हणत होतास, तें करण्यासाठीं मी मागतों तेंहि तुला देववत नाहीं ! पंचवीस-तीस रुपयांच्या घड्याळाहून तुझें तें पवित्र कर्तव्य हलक्या दर्जाचें आहे असें म्हटलें पाहिजे."

उस्मानला हा बाण फारच झोंबला. त्या झपाट्यांतच त्यानें आपल्या हातावरलें चांदीचें घड्याळ करीमला देऊन टाकलें.

" वाः उस्मान, तुझें आपल्या धर्मावर किती प्रेम आहे हें यामुळें अगदीं उघड होत आहे. इतका तुझा निश्चय असल्यावर अल्ला तुझ्यावर खास मेहेरनजर करील. "

उस्मानला या बोलण्यांत चेष्टेचा भास झाला. करीमचा त्याला राग आला होता. त्याला तेथल्या तेथें पाडून त्याचीं हाडें खिळखिळीं करावीं अशी त्याला अनावर इच्छा झाली, परंतु त्यानें ती महत्प्रयासानें दाबून टाकली. नरमाईनें त्यानें विचारलें,

" करीम, आतां तरी तूं गप्प बसशील ना ? "

" वा: हें काय विचारतोस ? उस्मान, तुझ्या या पवित्र कार्यांत मी मदत केली नाहीं तरी तुला मोडता आणणार नाहीं खास. "

करीमचा लाळघोटेपणा उस्मानच्या ध्यानांत येऊन त्याला त्याचा तिटकारा वाटला. करीमला त्याच्या तिरस्काराची कवडीचीहि किंमत वाटली नाहीं. दांत विचकून तो चालता झाला.

उस्मान तेथेंच एका दगडावर बसून आपलें काम कसें पार पाडावें याचा विचार करूं लागला. आपल्या एकट्याच्यानें तें काम पार पडेल कीं नाहीं याची त्याला शंका वाटत होती; पण काय वाटेल तें झालें तरी परत फिरावयाचें नाहीं आणि दुसऱ्या कोणाची मदत मागावयाची नाहीं असा त्यानें निश्चय करून टाकला. हा निश्चय केल्यावर त्याचा पूर्वीचा उत्साह पुन्हां जागृत झाला. त्या भरांतच तो घरीं आला.

रात्रीं दहा वाजतां उस्मान सिनेमाला म्हणून बाहेर पडला; पण पैशाबरोबर त्यानें एक हातोडाहि कोटाच्या आंतल्या बाजूला लपवून

घेतला. रात्रीं बाहेर जाण्याला भावाजवळून परवानगी मिळविण्यापुरतीच त्याची सिनेमाची सबब होती, हें तें पाहिल्याबरोबर कोणालाहि कळून आलें असतें.

*　　　*　　　*

मध्यरात्रीं उस्मान सिनेमागृहांतून उठला आणि घरीं न येतां तो गांवाबाहेरील टेकडीवर चढूं लागला. टेकडीवर या वेळीं निःशब्दता पसरली होती. आधींच मध्यरात्रीची वेळ, आणि त्यांत गांवापासून टेकडी दूर असल्यामुळें तर त्या निःशब्दतेंत एक प्रकारची भीषणता वाटत होती. देवळांतील पुजारी नित्यनियमाप्रमाणें संध्याकाळींच येऊन पूजाअर्चा करून गांवांत आपल्या बिऱ्हाडीं गेला होता. टेकडी लहानशीच असल्यामुळें तो केव्हांच वर गेला. टेकडीच्या माथ्यावर मारुतीचें देवालय होतें. एका अंगाला लहानशा गाभाऱ्यांत मारुतीची दोन हात उंचीची कोरीव मूर्ति असून गाभाऱ्याच्या पुढील बाजूस लहानसा सभामंडप होता.

सभामंडपाच्या दाराशीं उस्मान जरा घोटाळला. आंत पाऊल टाकण्याची इच्छा असूनहि तशी कृति त्याच्याकडून होईना, याबद्दल त्याचें त्यालाच आश्चर्य वाटलें. दोन मिनिटें धरून ठेवल्याप्रमाणें तो दरवाज्याच्या फळीला हात देऊन उभा होता. आल्या वाटेनें परत जावें अशी तीव्र इच्छा त्याला झाली. कोणी ढकलून देत असल्याप्रमाणें तो थोडा मागेंहि सरला.

पण त्याबरोबरच उस्मानच्या मनानें उलट खाल्ली. आपल्या भेकड मनाचाच हा परिणाम असला पाहिजे असें वाटून तो आपल्यावरच रागावला. त्याचें रक्त सळसळूं लागलें. आपल्या भेकडपणाविरुद्ध लढाई करण्यासाठींच म्हणून त्यानें देवळांत पाऊल टाकलें.

देवळांत या वेळीं कोणीच नव्हतें; आणि कोणी असण्याचाहि संभव नव्हता. गाभाऱ्यांत देवाजवळ एक समई मिणमिण तेवत होती. अगदीं गाभाऱ्याशीं गेल्यावर उस्मानला मूर्ति स्पष्ट दिसली. मूर्ति पाहून उस्मानला प्रथम हंसूंच आलें. फिदीफिदी हंसत तो म्हणाला,

" काय हे पागल लोक आहेत ! अल्लाला भजायचें सोडून माकडाला देव समजून त्याची पूजा करतात; आणि पुन्हां अल्लापेक्षां हें माकड श्रेष्ठ आहे म्हणून सांगत असतात. " उस्मान चिडून बोलूं लागला, " अल्लापेक्षां हें माकड श्रेष्ठ आहे काय ? असलीं सगळीं माकडें आणि सगळे ते काफिरांचे दगडी देव फोडून तोडून टाकले पाहिजेत. आणि सगळ्या काफिरांना मुसलमान केलें पाहिजे."

उस्माननें बोलतां बोलतां कोटाच्या आंतील बाजूस लपवलेला हातोडा बाहेर काढला. " निदान या एका माकडाचा तरी मी आज नायनाट करणार. अल्ला माझ्यावर खात्रीनें खूष होईल. बेहस्तांत किती तरी पऱ्या मला मिळतील."

नेम घेण्यापूर्वी उस्माननें दोनतीन वेळां हातोडा फिरवला, आणि खूप जोरानें तो मूर्तीच्या तोंडावर मारला. त्या घावानें एक शेंदराची खपली मात्र पडली. आपली सगळी शक्ति एकवटून उस्माननें दुसरा घाव मारला. तोंडाचा एक मोठा कळपा उडाला. यानंतर त्यानें भराभर घाव घालून मूर्तीचे तुकडे तुकडे करून टाकले. हातोडा खालीं टाकून विजयानें त्या तुकड्यांकडे पाहत उस्मान हातरुमालानें घाम पुसूं लागला. तो इतका दमला होता कीं, गाभाऱ्याच्या उंबऱ्यावर डोळे मिटून गुडघ्यावर डोकें ठेवून तो

स्वस्थ बसला. कांहीं वेळानें त्यानें डोळे उघडून समोर पाहिलें तों भीतीनें त्याच्या तोंडून एक अस्फुट किंकाळी बाहेर पडली. त्या वेळीं देवळांत कोणी येईल ही कल्पनाहि त्याच्या मनाला शिवली नसल्यानें आपल्यासमोर आपण टाकून दिलेला हातोडा हातांत घेऊन पिशाच्च उभें आहे आणि तें तो हातोडा आपल्या डोक्यांत घालणार अशा कल्पनेनें उस्मानची बोबडी वळली. त्याचें अंग लटलट कांपूं लागलें, त्याचें रक्त जणूं गोठून गेलें ! त्यानें आपले डोळे झांकून घेतले.

त्याची ती स्थिति पाहून करीमला अतिशय हंसूं आलें. उस्मान आपल्याला पिशाच्च समजत असला पाहिजे असा त्यानें तर्क केला.

" हः हः उस्मान, अरे असा घाबरतोस काय मला ? मी कांहीं पिशाच्च नाहीं; तुझा मित्र करीमच आहें. तूं म्हटल्याप्रमाणें खरेंच करतोस कीं नाहीं हें पाहण्याची मला फार उत्सुकता वाटूं लागली, म्हणून मी तूं सांगितलेल्या वेळेवर आलों. तूं तर काम आटपूनहि टाकलें आहेस. शाबास, उस्मान, शाबास ! आज तूं केवढें पवित्र कार्य केलेंस ! " करीमनें उस्मानची पाठ थोपटली.

करीम रात्रीं अकरा वाजल्यापासून उस्मानची वाट पाहत टेकडीवर देवळाच्या बाजूला लपून बसला होता. उस्मान काय काय करतो हें तो चोरून पाहत होता. उस्माननें हातोडा खालीं टाकल्या-बरोबर तो हस्तगत करण्याकरितां करीम देवळांत आला.

" मी करीम आहें," हे शब्द ऐकतांच उस्मानची भीति पार नाहींशी होऊन त्यानें डोळे उघडले. करीमला पाहतांच त्याला चीड आली. शिवाय करीमच्या बोलण्यांत त्याला चेष्टेचाहि भास झाला.

" तुझ्यासारख्या भेकड आणि नीच माणसाची शाबासकी मला नको आहे, समजलास. चल हो चालता इथून. काफिर ! "

" उस्मान, तोंड संभाळून बोल. तूं आतां माझ्या हातांत सांपडला आहेस; आणि तुझ्या शिव्यांचा मी सूड घेतल्याखेरीज राहणार नाहीं. आतां जाऊन मी पोलिसाला वर्दी देतों. हा हातोडा तुझ्याविरुद्ध पुराव्याला पुरे होईल. "

उस्मान या जरबेच्या भाषणानें घाबरला; पण तसें न दाखवतां तो म्हणाला, " खुशाल पोलिसला आण, मी सांगेन कीं ' यानेंच मूर्ति फोडली असून आतां हा माझ्यावर आळ घालीत आहे.' तो हातोडा तुलाच गोत्यांत आणील."

" पण, उस्मान, ते पाहिलेस का तुझ्या कपड्यांवरचे शेंदराचे डाग—आणि तुझ्या हाताला सुद्धां शेंदूर लागला आहे. घाम पुसतांना हातरुमालावर तुझीं शेंदरी बोटें उमटलीं आहेत. तूं मघाशीं हातांवर तोंड ठेवल्यामुळें तोंडालादेखील शेंदूर लागला आहे. " करीम खालीं पडलेला हातरुमाल उचलीत विजयी मुद्रेनें बोलला.

उस्माननें आपल्या कपड्यांकडे आणि हातांकडे पाहिलें. खरोखरच त्याच्या हाताला शेंदूर लागला होता. तो वेड्यासारखा त्या डागांकडे पाहत राहिला; पण त्याच्या अंतश्चक्षूला कांहीं वेगळेच देखावे दिसूं लागले—पोलिस आपल्या हातांत हातकड्या घालून नेत आहेत, करीम हेटाळणीनें हंसत बरोबर येत आहे, मग आपल्याला शिक्षा झाली असून आपण तुरुंगांत खितपत पडलों आहों !

उस्मान आपल्या विचारतंद्रींतून एकदम जागा झाला. आपण करीमच्या हातांत पुरते सांपडलों आहों अशी त्याची खात्री झाली. दीन मुद्रेनें तो करीमकडे पाहून म्हणाला,

" करीम, मला शिक्षा झाल्यानें तुला काय बरं फायदा होणार आहे ! उलट तूं जर गप्प बसलास तर, हें बघ, ही अंगठी मी तुला

देईन. याहून मौल्यवान् अशी वस्तूच माझ्याजवळ नाहीं; नाहीं तर मी ती तुला दिली असती. 'घड्याळ आणि अंगठी हरवली' म्हणून मी भावाला सांगेन."

आशाळभूतपणानें अंगठीकडे पाहत करीमनें ती घेतली. "आतां कसा ठीक वागतो आहेस! पहिल्यानेंच शिन्या न देतां माझें ऐकलें असतेंस तर हा वितंडवाद घालण्याची पाळी कशाला आली असती! बरें जाऊं दे. मी कोणालादेखील आजचा प्रकार सांगणार नाहीं. हा बघ मी मुकाट्यानें चालता होतों." करीम खरोखरीच निघून गेला.

उस्मानहि कांहीं वेळानें उठला. करीमनें हातोडा आणि हातरुमाल नेल्याचें त्याच्या आतां लक्षांत आलें. नीच करीमच्या हातांत आपण अजून असल्याचें त्याला कळून येऊन त्याचें मन अस्वस्थ झालें. करीमवर जळफळत, 'आपण त्याची मदत मागायला कशाला गेलों!' म्हणून मनांत आपल्यावरच चरफडत उस्मान देवळाबाहेर पडला.

* * *

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मोरभट पुजारी पूजेसाठीं आले; पण देवळांत पाऊल टाकतात तों मूर्ति भंगलेली त्यांच्या दृष्टीस पडली. त्यांच्या छातींत चर्र झालें. हतबुद्ध होऊन ते छिन्नविच्छिन्न झालेल्या मूर्तीकडे पाहत राहिले. कांहीं वेळानें ते भानावर आले.

"खास हें कोणातरी मुसंड्याचेंच काम असलें पाहिजे. लवकर पोलिसांत वर्दी दिली तर तो बदमाष सांपडेलहि कदाचित्."

मोरभट जवळजवळ धांवतच निघाले. जो भेटेल त्याला मूर्ति भंगल्याची अशुभ वार्ता सांगत ते चौकीवर गेले. विजेच्या वेगानें

सर्व गांवांत ती बातमी पसरली. पोलिसांच्या मागोमाग लोकांच्या झुंडीच्या झुंडी देवळाकडे निघाल्या. पोलिसांना गुन्हेगाराचा मुळींच तपास लागेना. हिंदु लोक अतोनात खवळले असल्यामुळें गांवांत जादा पोलिस हिंडूं लागले; त्यामुळें दंगा मात्र झाला नाहीं.

थोड्याच दिवसांनीं गांवांतील एका धनाढ्य सद्गृहस्थानें दुसरी एक चांगली मारुतीची मूर्ति करवली. गांवकऱ्यांनीं मोठ्या समारंभानें भंगलेल्या मूर्तीच्या जागीं तिची प्राणप्रतिष्ठा केली, पण लोकांच्या मनाला धक्का बसला होता. झालेल्या गोष्टीबद्दल लोक तर्ककुतर्क करीत होते.

* * *

या गोष्टीला दहा वर्षें झालीं होतीं. उस्माननें एक किराण्या मालाचें दुकान घातलें असून इतक्या वर्षांत त्याचा व्याप पुष्कळ वाढून त्याला बरीच किफायत झाली होती. त्यामुळें गांवांत त्याची पतहि वाढली होती.

या दोन्ही गोष्टींचा करीम पुरा फायदा घेत होता. इतकीं वर्षें गुन्हा माहीत असून गप्प बसल्यावर उस्मानवर गुन्हा शाबीत करतां येईल कीं नाहीं आणि त्यांत आपल्यालाच कांहींतरी शिक्षा होईल अशा शंकेनें करीमला फारसें कांहीं करतां आलें नसतें; पण आपण उस्मानचें पूर्वीचें कृत्य लोकांना सांगितलें तर त्याची बेअब्रू होऊन त्याचा धंदा बसेल हें करीमला माहीत होतें. उस्मानलाहि त्याची जाणीव असल्यानें करीम जें जें मागेल तें तें तो त्याला देत असे. उस्मान चरफडे, धडपडे, करीमला धमक्या देई; पण करीमनें संथपणें उस्मानला पिरगाळणें सुरू ठेवलें होतें. उस्मानच्या दुकानांत मिळणारा माल करीम महिन्याच्या महिन्याला घेऊन जात असे.

तो कधींमधीं पैसेहि मागे. उस्मानला चांगले पैसे मिळूं लागल्यापासून करीमच्या मागण्याहि फुगत चालल्या होत्या.

आज करीम दुकानांत माल न्यावयाला आला असतां त्याला पाहून उस्मानच्या पायाची तिडीक मस्तकांत गेली. संतापाच्या भरांत त्यानें करीमला साफ सांगितलें कीं, " काय वाटेल तें झालें तरी तुला मी कवडीचाहि माल देणार नाहीं. "

करीम टवाळी करीत हंसत म्हणाला, " अरे जा, मला नाहीं म्हणण्याची तुझी काय प्राज्ञा लागून गेली आहे ! नाहीं तर आज दहा वर्षें मला तुझ्या दुकानचा माल पुरवण्याची हमी तूं कशाला घेतली असतीस ? "

" दहा वर्षें झालें तें झालें. आतां यापुढें मी तुझ्या हातांत राहणार नाहीं. देत नाहीं माल तुला. बऱ्या बोलानें आधीं चालता हो इथून; नाहीं तर याद राखून ऐस. "

" हें बघ, उस्मान, तुला चेष्टा वाटत असेल; पण तो हातरुमाल आणि हातोडा माझ्याजवळ अजून आहे समजलास. "

नेहमीं लागू पडणारी करीमची गोळी आज नीटशी लागू पडली नाहीं. " करीम, मी तुरुंगांत गेलों तरी बेहेत्तर, पण यापुढें तुझा जाच मी सहन करणार नाहीं. तीळ तीळ मांस तोडून न्यावें तसाच तूं मला लुटीत आहेस. मला तुझ्यापुढें मान वांकवावी लागते म्हणून माझ्या जिवाचा असा संताप होतो कीं मला जगूं-सुद्धां नयेसें वाटतें आहे. तूं तडजोडीला कबूल असलास तर पहा. मी एकदमच तुला कांहीं रक्कम देतों. त्याबद्दल तूं मला तो हातोडा आणि हातरुमाल परत दिला पाहिजे. हें तुला कबूल नसलें तर तुला काय करायचें असेल तें कर. "

आज गोष्ट निकरावर आली आहे हें धूर्त करीमनें ताडलें. उस्मानच्या म्हणण्याप्रमाणें तडजोड केली तर आपला फायदा आहे हें त्याला समजत होतें. कारण उस्मानला तुरुंगांत घालून करीमला कांहींच मिळणार नव्हतें. उलट त्याला मोकळा ठेवल्यामुळेंच करीमचा फार फायदा झाला होता.

" बरं बरं, उस्मान, आपण एकदांच तडजोड करून टाकूं. मी तुझ्या गुन्ह्याचा पुरावा तुला परत द्यायला तयार आहें; पण तूं तो कांहीं चांगल्या किंमतीला विकत घेतला पाहिजे. "

" करीम, आतां तूं जा; मारुतीच्या पायथ्याजवळच्या आंब्याच्या झाडाखालीं तूं आज संध्याकाळीं ये. तेथेंच आपण यासंबंधीं बोलूं. इतक्यांत एखादें गिऱ्हाईक आलें तर पंचाईत होईल. "

एक अक्षरहि न बोलतां करीम दुकानाबाहेर पडला. उस्मानचा आपल्या हातांतून निसटण्याचा निश्चय झाला असून तो पुरता निसटण्यापूर्वीच त्याला शक्य तितका पिळून काढला पाहिजे, असा त्यानें मनांत संकल्प ठरवून टाकला.

* * *

या गोष्टीला कांहीं महिने होऊन गेले होते. भर दुपारची वेळ होती. या वेळीं कुणी उस्मानला जर शोधून पाहिलें असतें तर तो त्यांना त्याच्या घरीं सांपडला नसता, दुकानांत सांपडला नसता किंवा गांवांतहि दुसऱ्या कुठें सांपडला नसता. कारण उस्मान या वेळीं तुरुंगांत होता. या बिनभाड्याच्या घरांत येऊन त्याला आठ दिवस झाले होते. त्याला जन्मठेप सक्तमजुरीची शिक्षा मिळाली होती. त्याची सक्तमजुरीची शिक्षा आजच खरी सुरू झाली होती. दगडफोडीच्या कामाला आज तो सुरुवात करीत होता.

ज्या आंब्याच्या झाडाखालीं दहा वर्षांपूर्वी उस्माननें मूर्ति फोडण्याच्या कामीं करीमची मदत मागितली आणि त्याबरोबरच आपली मान त्याच्या हातीं दिली, त्याच झाडाखालीं चार महिन्यांपूर्वी करीमशीं ठरविल्याप्रमाणें तडजोड करण्यासाठीं म्हणून उस्मान संध्याकाळीं गेला होता. करीम अवाच्या सवा रक्कम मागूं लागला. दोघांची पुष्कळच बाचाबाची होऊन संतापाच्या तिरमिरींत उस्माननें शेजारचा एक धोंडा उचलून करीमच्या डोक्यांत घातला.

त्या दोघांची बोलाचाली चाललेली असतां गांवांतील तालमीचे मराठा जातीचे वस्तादजी कांहीं शिष्यांसह मारुतीचें दर्शन करून परत येत होते. मूर्ति फोडल्याचा उल्लेख ऐकून त्यांना कुतूहल उत्पन्न झालें आणि ते या दोघांच्या नकळत त्यांचें बोलणें ऐकत उभे राहिले. त्या बोलण्यावरून दहा वर्षांपूर्वी मारुतीची मूर्ति कोणीं फोडली हें रहस्य वस्तादजींना समजलें. गुन्ह्याचें सर्व स्वरूप या दोघांच्या तोंडून ऐकून मग पुढें व्हावें असा विचार करून ते स्वस्थ राहून ऐकत होते. बोलतां बोलतां उस्मान आणि करीम चिरडीला आले. संतापानें वेडापिसा झालेल्या उस्माननें करीमचा खून केला. उस्माननें हें कृत्य इतक्या झर्रकन् केलें कीं, करीमला कांहींच प्रतिकार करतां आला नाहीं. उस्माननें धोंडा उचललेला पाहून वस्तादजी पुढें येतात तोंच उस्माननें तो करीमच्या डोक्यावर फेंकलासुद्धां! करीमचें डोकें फुटून तो तात्काळ मरण पावला. उस्मान भ्रमिष्टपणानें त्या विद्रूप मस्तकाकडे पाहत उभा राहिला होता.

वस्तादजी आणि त्यांचे शिष्य यांनीं उस्मानला धरून गांवांत चौकीवर नेलें. उस्मान मुकाट्यानें गेला. वस्तादजीनें हातोडा आणि हातरुमालहि पोलिसांत सादर केला.

या दोन गुन्ह्यांबद्दल उस्मानला जन्मठेप शिक्षा ठोठावण्यांत आली होती. त्याला फांशीचीच शिक्षा व्हायची; पण दारू पिऊन तिच्या भरांत गुन्हा केल्याच्या सबबीवर तो सुटला. कित्येक कैदी उस्मानप्रमाणेंच सक्तमजुरीची शिक्षा भोगावयास आलेले होते त्यांच्यांतच त्यांच्याचप्रमाणें तुरुंगांतील जाडाभरडा आणि अपुरा पोषाख करून उस्मान बसला होता. त्याच्यासमोर दगड आणि एक मोठा हातोडा पडला होता. उस्मानच्या मनांत विचारांचें नुसतें काहूर उठलें होतें. त्या भरांतच त्यानें दगडावर पहिला घाव घातला.

त्या घावाबरोबर उस्मानचें काळीज चरचरलें. दहा वर्षांपूर्वी मूर्तीवर घाव घालीत असल्या वेळचा प्रसंग लालभडक रंगांत त्याच्या नजरेसमोर उभा राहिला. मूर्तीच्या दगडावर त्यानें अगदीं असाच घाव मारला होता. दहा वर्षांपूर्वी, पण अगदीं याच महिन्यांत! आणि याच दिवशीं!! हा योगायोग किती विलक्षण! 'त्यांत कांहीं दैवी घटना तर नाहीं ना?' अशीहि उस्मानच्या मनांत क्षणभर शंका येऊन गेली.

तितक्यांत कैदी स्वस्थ बसल्याचें पाहून वॉर्डरनें एक शिवी हांसडून उस्मानच्या पाठीवर सणसणीत कोरडा ओढला. उस्माननें कळवळून एकदम वर पाहिलें. वॉर्डरचें पाळलेलें माकड त्याच्या शेजारींच बसलेलें असून उस्मानकडे पाहून दांत विचकून हंसत होतें.

उस्मानचें रक्त गोठून गेलें. तें हंसणें पाहत थरथरणाऱ्या हातांनींच त्यानें दगडावर दुसरा घाव घातला!

---

# आई ग !

“ आई ग ! ” म्हणून मालती ओरडली.

शरच्चंद्रानें एकदम कानांवर हात ठेवले.

यावरून कुणाला वाटेल कीं, मालती एखाद्या घोर संकटांत सांपडली असून तिनें हृदयभेदक भीत्युद्गार काढला आणि तो ऐकून शरच्चंद्राच्या रक्ताचें पाणी पाणी होऊन, तो शरच्चंद्राच्या कोमल मनाला असह्य होऊन त्यानें कानांवर हात दाबून धरले.

छे छे, अगदीं मुळींसुद्धां तसें कांहीं घडलें नाहीं. क्लबवर बॅडमिंटनची गेम चालू असून शरच्चंद्र आणि मालती पार्टनर झालेले होते. चौघेहि खेळणारे चांगले असल्यामुळें खेळ छानच रंगत चालला होता. फाइव्ह ऑल, इलेव्हन ऑल असे पॉइंटस् वाढत होते. फूल या कोपऱ्यांतून त्या कोपऱ्यांत आणि क्षणांत जाळ्याजवळ अशा नेमबंद फेंकीमुळें चौघेहि फुलावर लक्ष ठेवून धांवपळ

करीत होते. आणि अशी धांवतांनाच मालती ओरडली होती. मालती अगदीं साईडलॉबीजवळ उभी असून फूल शरच्चंद्राच्या-पुढें जाळ्याजवळ पडत होतें. शरच्चंद्र पाठीमागें होता. फूल घेण्याकरितां मालती धांवूं लागली, आणि आपण फुलाशीं पोंचण्या-पूर्वींच तें खालीं पडतें कीं काय या भीतीमुळें व आवांक्याबाहेर पळण्यामुळें तिच्या तोंडून 'आई ग !' असा उद्गार बाहेर पडला.

मालतीला ही संवयच होती. ओरडल्यानंतर तिची तिलाच लाज वाटे, कारण विरुद्ध खेळणारे आणि आजूबाजूचे लोक यांच्या मुद्रेवर हास्यरेषा उमटून गेल्याचें तिच्या दृष्टोत्पत्तीस येई. मग ओशाळून तिलाहि हंसूं येई. पुन्हां म्हणून ओरडायचें नाहीं असा ती मनाशीं निश्चय करी, पण खेळण्याच्या भरांत केव्हां अचानकपणें ती 'आई ग !' म्हणून जाई हें तिचें तिलाच समजत नसे.

मालतीचा हा उद्गार ऐकून शरच्चंद्रहि प्रथम गंमत वाटून हंसला होता. पण पुन्हां दोनदां त्याची पुनरावृत्ति झाल्यावर तो चिडला. प्रत्येक वेळेला त्याला नर्व्हस शॉक बसल्याप्रमाणें होऊन तो अस्वस्थचित्त झाला. मालती पुन्हां ओरडते कीं काय इकडे लक्ष लागल्यामुळें खेळतांना तो बेसावध राहूं लागला. त्यानें केलेल्या ढोबळ चुका पाहून आणि त्याच्या कपाळावरील आंठ्या व चेहऱ्या-वरील रागाची छटा पाहून मालतीहि गोंधळून गेली. तीहि चुकूं लागली. आणि मँग काय, गेम अर्थातच विरुद्ध बाजूनें जिंकली.

यानंतर पुन्हां जेव्हां जेव्हां म्हणून शरच्चंद्र आणि मालती पार्टनर होऊन खेळत तेव्हां तेव्हां तीं हरत असत. प्रथम दोघें सुरुवात सुरेख करीत, पण एकदां मालती ओरडली कीं शरच्चंद्र

नर्व्हस होऊन जाई. मालतीहि स्वतःवर रागवत असे, केव्हां शरच्चंद्रावर रागवत असे. आणि सगळ्याचा परिणाम दोघें वाईट खेळण्यांत होई.

अशींच एकदां दोघें गेम हरवून कोर्टवरून बाजूला जात होतीं. त्यांचे प्रतिस्पर्धी या दोघांच्यापेक्षां साधारण खेळणारे असूनहि त्यांनीं डाव जिंकला होता.

अन् म्हणूनच मालती रागावली होती. स्वतःवर नव्हे तर शरच्चंद्रावर. नाहींतरी आतांशीं दोघेंहि एकमेकांवर रागावलेलीं होतीं. दोघांची इतकी मैत्री, एरवीं सर्व गोष्टी दोघें मिळून करीत. त्यांना त्यापासून अतिशय आनंद होई. पण शरच्चंद्राच्या आग्रहावरून मालती त्याच्या क्लबांत खेळावयास जाऊं लागली आणि दोघांच्या खेळण्याच्या आनंदांत अपजयाचें विष भिनूं लागलें तेव्हां दोघांच्याहि मैत्रींत जरा व्यत्यय येऊं लागला.

कोर्टवरून पलीकडे जाऊन मालतीनें रॅकेट बाकावर आदळली. स्वतःहि ती जरा जोरांतच खालीं बसली, व ब्लाउजच्या खिशांतून आपला चिमुकला रुमाल काढून कपाळावरील व मानेवरील घर्मबिंदु पुसूं लागली. तिचें गौरवर्ण मुख आरक्त होऊन गेलें होतें. अंबाडा सैल होऊन त्याचें शेवट पाठीवर सुटलें होतें, व बऱ्याचशा बटा कपाळावर व कानांवर रुळत होत्या.

एरवी खेळ संपल्यावर दोघांनीं स्मितमुखानें परस्परांकडे पाहावयाचें हा शिरस्ता. परंतु आज शेजारून चाललेल्या शरच्चंद्राकडे कपाळाला खूप आंठ्या घालून पाहत मालती म्हणाली, "मी आतां पुन्हां तुमची पार्टनर होणारच नाहीं."

शरच्चंद्रानेंहि कपाळाला खूप आंठ्या घातल्या. रॅकेटनें एका

काल्पनिक शटल्ला मारल्यासारखें करून तो बेपर्वाई दर्शवून बोलला, " फारच उत्तम. मलादेखील आतांशीं तसंच वाटूं लागलं होतं. आपलं दोघांचं खेळणं कांहीं जमत नाहीं. "

मालती चिडून म्हणाली, " कसं जमेल ? तुम्ही आपले कांहीं तरीच खेळतां. लक्षच नसतं तुमचं खेळण्यांत. "

शरच्चंद्र मालतीच्या शेजारच्या खुर्चीवर बसला. रॅकेट बाकाला टेकून ठेवून, गळ्याला रुमाल बांधीत तो उपरोधिक स्वरानें बोलला, " तुम्हांला खेळतांना ओरडायला पाहिजे असतं ना. "

" ओरडायला पाहिजे असतं ! " मालती आवाज चढवून म्हणाली. " म्हणजे मी मुद्दाम ओरडतें वाटतं. ओरडायचं नाहीं म्हणून मी किती तरी निश्चय करतें पण तोंडांतून अचानक ' आई ग ! ' म्हणून निघून जातं त्याला मी तरी काय करूं ? अन् तुम्हांला तरी तेवढ्यावरून रागवायचं काय कारण ? जरा ओरडलें कीं झालं, लगेच खेळांत दुर्लक्ष करतां. "

"जरा ओरडलें कीं ! " शरच्चंद्र हेटाळणीनें म्हणाला. " खेळण्यांत मनाची एकाग्रता झालेली असतांना तुमच्या किंचाळ्या ऐकून नर्व्हस शॉक बसतो. त्यामुळें खेळांत लक्ष लागत नाहीं. "

मालती आतां कमालीची चिडली. " किंचाळतें कां मी ? "

शरच्चंद्रहि झोंबऱ्या आवाजांत म्हणाला, " नाहीं तर काय ? कानठळ्या बसतात एकदम. कर्कश किंचाळणं अगदीं. "

" माझं ओरडणं म्हणजे कर्कश किंचाळणं वाटतं तेव्हां तुमचे कान फार मोठे असले पाहिजेत. " मालती पुटपुटली. मालतीला आपल्या गोड आवाजाबद्दल केवढा तरी अभिमान होता !

पण शरच्चंद्रानें तिचे शब्द ऐकलेच. आश्चर्य आणि अपमा-

नाचा राग यांनीं मिश्र भावना होऊन त्यानें विचारलें, " काय म्हणालांत ? "

रागाच्या भरांत आपण नको तें बोलून गेलों म्हणून मालती ओशाळली. वाईट वाटून ती म्हणाली, " कांहीं नाहीं. आपण यापुढें पार्टनरच होऊं नये म्हणजे झालं." मालतीनें आपल्या मतें भांडणाचा शेवट केला.

पण येवढ्यावर शरच्चंद्र कुठला ऐकायला ! दंतपक्ति दिसण्याइतकें हास्य चेहऱ्यावर बळेंच ओढून आणून आणि स्वरांत मृदुता व आर्जव दर्शवून तो म्हणाला, " मग त्यापेक्षां मनावर जरा ताबा ठेवून खेळतांना किंचळायचं बंद केलंत तर नाहीं कां चालायचं ?"

मालतीचा विझत चाललेला क्रोधाग्नि चांगलाच भडकला. वेडावून ती बोलली, "नाहीं चालायचं बरं. मी अशीच ओरडणार. तुम्ही वाटल्यास आपल्या नर्व्हज्‌वर ताबा ठेवा."

शरच्चंद्र बेपर्वाई दाखवून उत्तरला, "काय जरूर? तुम्ही जर अशाच ओरडणार तर मी पण--" पुढें काय शब्द योजावा या विचारांत शरच्चंद्र क्षणभर पडला. पण तो कांहीं बोलण्यापूर्वीच मालती कुचेष्टेनें स्वाभिमान दर्शवीत म्हणाली, " तर तुम्ही पण असेच घाबरणार !"

या तिच्या बोलण्याचें शरच्चंद्रालासुद्धां हंसूं आलें. पण तें दाबून तो बसल्या जागेवरून उठला आणि पलीकडे गेला.

कोर्टवर खेळणाऱ्या चौघांखेरीज दुसरें कोणी शेजारीं नव्हतें म्हणून बरें. दोघें बोलत असल्याचें सर्वांना कळलें, पण तीं काय बोलत आहेत हें मात्र कोणाला कळलें नाहीं. पण त्या दिवसानंतर दोघेंहि एकमेकांचे पार्टनर होण्याचें टाळीत, हें मात्र सगळ्यांच्या लक्षांत आलें.

खेळण्याचेंच काय पण दोघें बोलण्याचेंसुद्धां टाळीत. त्यांच्या मैत्रींत बिघाड झाला होता. दोघांनाहि त्यामुळें मनस्ताप होई. एकमेकांशीं बोलल्यावांचून त्यांना चैन पडत नसे. पण अभिमानामुळें कुणीच मागें घेईना.

या भांडणाबद्दल लोकांनीं त्यांना विचारलें, तेव्हां दोघांनींहि आपापल्या परीनें आपली बाजू संभाळून दुसऱ्याचें दोषदिग्दर्शन केलें. अर्थात् खेळतांना ओरडण्यामुळें भांडणाला सुरुवात झाली, हें दोघेंहि सांगत नसत. त्यांची त्यांनासुद्धां ती बाब क्षुल्लक वाटे. पण दोघेंहि मनाला सांगत, "असेना कारण क्षुल्लक, हा प्रश्न स्वाभिमानाचा आणि व्यक्तित्वाचा आहे. दुसऱ्याकरितां आपला स्वाभिमान, आपलें व्यक्तित्व सोडायचें कीं काय ? मुळींच नाहीं." पण लोकांना ही विचारसरणी पोरकट वाटेल कीं काय अशी शंका दोघांना येऊन तीं खरें कारण लोकांना सांगत नसत. मालती खेळण्यास उठली कीं शरच्चंद्र बसून राही. क्रेम असला तरी खेळत नसे. दुसऱ्या कुणाला खेळूं देई. आपल्या ओरडण्याची मालतीला इतकी लाज वाटूं लागली होती कीं, इच्छाबळानें तिचें ओरडणें अगदीं कमी होत चाललें होतें. पण मजा ही कीं, शरच्चंद्र खेळ बघत आहे हें मालतीच्या लक्षांत आलें कीं तिच्या नकळत ती ओरडे. अगदीं खरोखरीच नकळत ती 'आई ग !' म्हणून म्हणे.

अन् गंमत ही कीं, बाजूला बसून खेळ पाहत असतां मालतीचें ओरडणें शरच्चंद्राला पूर्वीइतकें कर्णकटु वाटेनासें झालें. इतरांप्रमाणें त्यालाहि हळूहळू गंमत वाटून हसूं येऊं लागलें होतें. एवढ्याशा ओरडण्यानें आपली कशी चलबिचल होई आणि आपला खेळ बिघडे, याबद्दल त्याचें त्यालाच नवल वाटूं लागलें.

पण असें हें सरळ कबूल करून मालतीबरोबर तो खेळावयास उठला असता तर मग स्वाभिमान तो कुठें राहिला ?

मालती दुसऱ्या पार्टनरबरोबर खेळते अन् पुन्हां चांगली खेळते, याचें त्याला वैषम्य वाटूं लागलें. तो मुद्दामच दुसऱ्या खायकांच्या खेळण्याची प्रशंसा करण्याकरितां 'प्लेड्', 'प्लेड्' म्हणें. मालतीनें एखादा चांगला शॉट मारला कीं आपलें लक्षच नाहीं असें तो दाखवी. मालती चुकली कीं तो हंसे. मालती ज्या बाजूला असेल त्याच्या विरुद्ध बाजूनें शरच्चंद्र डावाचा उठाव करी. परंतु या गोष्टी इतरांच्या लक्षांत येऊं नयेत एवढा धूर्त-पणा तो राखी. मालतीला मात्र हा आडूनचा गोळीबार असह्य होऊं लागला. तिचा खेळ बिघडूं लागला, आणि एके दिवशीं खेळतांना ती जवळ जवळ रडकुंडीला आली. ती अगदीच कांहींतरी खेळत होती. शरच्चंद्राला विलक्षण हुरूप चढून तो विरुद्ध बाजूला असलेल्या बाईला 'प्लेड्', 'प्लेड्' करीत होता. ती बाई या प्रशंसेनें खुशालून खरोखरीच चांगली खेळत होती. गेम झाल्याबरोबर मालतीनें कुणाकडे बघितलेंसुद्धां नाहीं. ती तडक घरीं निघून गेली.

चार दिवस मालतीचा क्लबवर पत्ता नव्हता.

शरच्चंद्राला हळूहळू आपल्या वर्तनाचा पश्चात्ताप वाटूं लागला. त्याला क्लबवर ओसाड वाटूं लागलें. खेळण्यांत त्याचें लक्षच लागेना.

* * *

शरच्चंद्र-मालती हीं विद्या, वय, सौंदर्य वगैरे सर्वच दृष्टींनीं अनुरूप होतीं. परस्पर प्रणयाराधनेंत गुंतलेलीं असून लवकरच क्लबला मेजवानी देणार अशी सर्व मंडळींना आशा वाटत होती. मालती

क्लबवर येत नाहीं व शरच्चंद्राला तिचा विरह चालत नाहीं हें बघून इतर मेंबर्सनीं त्याची चेष्टा करण्यासहि कमी केलें नाहीं. शरच्चंद्र चुकूं लागला कीं एकानें विचारावें, "अरे कायरे ?" अन् दुसऱ्याच कुणीं उत्तर द्यावें, "अरे, कोर्टावर अंधार आहे सगळा. तो तरी काय करील ?"

शरच्चंद्रानें आणखी एक दिवस जेमतेम काढला. नंतर तो मालतीच्या घरीं गेला.

मालतीला तरी घरीं कुठें चैन पडत होतें ! जिवाचा अगदीं निग्रह करूनच तिनें हे पांच दिवस काढले होते. ती शरच्चंद्राची सारखी वाट बघत होती. वाट पाहून पाहून ती अधीर होऊन गेली होती. काल रात्रीं तर ती थोडी रडलीसुद्धां.

आणि आतां शरच्चंद्राला बघून तिला केवढा तरी आनंद झाला. पण शरच्चंद्रानें ज्याप्रमाणें आपला आनंद झांकून ठेवला त्याचप्रमाणें मालतीनेंहि मुद्दामच आपली मुद्रा बेपर्वाईची केली.

प्रेमी माणसें हीं अशीं कां वागत असतात हें कुणी सांगूं शकेल काय ?

जणुं आपल्या भावाचा कुणी मित्र सहज आला आहे अशा प्रकारचें औपचारिक स्मित करून मालतीनें सांगितलें, "दादा घरांत नाहीं."

शरच्चंद्राला वाटलें कीं, मी आपला मानापमान गुंडाळून ठेवून आलों तर हिला त्याची किंमतच नसावी ना ? जरा बाईट वाटून तो म्हणाला, "मला वाटलं तुम्ही आजारी आहां. म्हणून मी चौकशी करायला आलों होतों."

"बसा."

शरच्चंद्र दिवाणखान्यांतील कोचावर बसला. मालतीहि समोर बसली.

पुन्हां शरच्चंद्रानेंच विचारलें, " क्लबवर आलां नाहीं तीन चार दिवसांत ? " मालती क्लबवर बरोबर पांच दिवस आली नव्हती हें माहीत असून त्यानें मुद्दाम डिंवचलें.

मालती कोचावरल्या शेवरीच्या उशीशीं खेळ करीत होती. वर न बघतांच उपरोधिक पण खिन्न स्वरांत तिनें उत्तर दिलें, " काय करायचं येऊन ? मला मुळीं खेळतांच येत नाहीं. उगीच चेष्टेचा विषय करून घेण्यासाठीं कशाला यायचं ? "

मालतीनें आवंढा गिळला.

शरच्चंद्र काय उत्तर देणार ? पण उत्तर दिलें पाहिजे म्हणून तो म्हणाला, " उगीच कांहींतरी मनाची कल्पना करून घेतली आहांत झालं."

मालती या उत्तरानें स्तिमित झाली. " कल्पना करून घेतली आहे ? " नंतर चिडून उपरोधानें हंसून ती बोलली, " तुम्हांला माझा खेळ फार आवडतो नाहीं ? "

शरच्चंद्रानें बिनदिक्कत उत्तर दिलें, " हो, अगदीं अतिशय आवडतो." किंचित् थांबून तो पुन्हां म्हणाला, " पुढल्या महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत आपल्या क्लबचे सामने होणार आहेत."

" ठरलं वाटतं सगळं नक्की ? " मालतीनें उत्साहभरानें विचारलें. " कोण कोण पार्टनर होणार आहेत ? "

शरच्चंद्र प्रेमभरानें हंसला. आपणां स्वतःकडे व मालतीकडे त्यानें अंगुलिनिर्देश केला.

"कोण ? तुम्ही न् मी पार्टनर ? आतां कां हो ? त्या दुसऱ्या बायकांना 'फ्रेड्', 'फ्रेड्' म्हणत होतां ना ? त्यांनाच विचारा की पार्टनर व्हायला. माझ्यापेक्षां किती सुंदर खेळतात त्या ! खात्रीनं तुम्ही चँपिअन याल." मालतीच्या नेत्रांत अश्रूंनीं चमक आणली.

"मला तुमच्याखेरीज दुसरा कोणी पार्टनर नको आहे." शरच्चंद्र सूचक अर्थानें मालतीकडे बघून हंसला.

तें हास्य मालतीला अतिशय हृद्य वाटलें. लज्जेनें अधोवदन होऊन तीहि हळूहळू हंसूं लागली.

इतका गोड समेट घडून आल्यामुळें शरच्चंद्र खुशालून गेला. त्यानें उत्साहानें विचारलें, "मग काय, देऊं ना आपलीं नांवें ?"

मालती खिन्न झाली. "पण आपला दोघांचा खेळ कुठें जमतो ? मी ओरडलें कीं तुम्ही नर्व्हस होतां. उगीच तुमचे चान्सेस माझ्यामुळं मी कशाला घालवूं ?"

शरच्चंद्र उद्वेगानें उठला-" बरं मग जातों मी."

"चहा घेऊन जा."

"नको, मला वेळ नाहीं." हॅट चढवून शरच्चंद्र तावातावानें निघून गेला.

मालतीला एकदम वाईट वाटलें. जाणाऱ्या शरच्चंद्राला परत बोलवावें असा मोह होऊन जिन्याशीं येऊन तिनें 'शरच्चंद्र' म्हणून हांकसुद्धां मारली. पण शरच्चंद्र केव्हांच गेला होता.

त्या दिवशीं संध्याकाळीं ती क्लबवर गेली अन् तिला कळलें कीं, बहुमतानें चिठ्ठया टाकून पार्टनर निवडावे असें ठरलें होतें. ती शरच्चंद्राला 'मी तुमची पार्टनर होण्यास तयार आहें' असें सांगणार होती, पण मग ती कांहीं बोललीच नाहीं. पण सकाळींच

शरच्चंद्र मालतीकडे गेला होता, वगैरे बित्तंबातमी क्लबमेंबर्सना कळली होती व शरच्चंद्राच्या मार्गे लागून त्यांनीं बाकीचीहि बातमी हळूहळू त्याच्याकडून काढून घेतली होती. अन् त्याला चिडवितांना त्याचे मित्र म्हणत, "अरे बेट्या, तुझी अब्रू राखण्या-साठीं आम्हीं हें लॉटस् टाकण्याचं ठरवलं, समजलास?"

शरच्चंद्र मालतीकडे बघतसुद्धां नव्हता. अन् मग क्लबवर शरच्चंद्र आहे कीं नाहीं याची गंधवार्ताच नसल्याप्रमाणें मालतीनेंहि आव आणला.

नंतर चिठ्ठया टाकण्यांत आल्या. हळूहळू चिठ्ठया उचलून नांवें वाचण्यांत येत होतीं. कुणाला वाईट वाटत होतें व कुणी आनंदांत होते.

शरच्चंद्र व मालती अधीर चित्तानें आपलें नांव कुणाबरोबर येतें याची वाट बघत होतीं. आणि त्या दोघांचीं नांवें जेव्हां बरोबर आलीं तेव्हां लोकांनीं केवढ्या टाळ्या वाजवल्या! अन् त्या दोघांचीं तोंडें काय पण प्रेक्षणीय झालीं होतीं!

एकमेकांकडे बघून मालती-शरच्चंद्र हंसलींच.

त्या हंसण्यांत आनंदाचा भाग होता कीं काय हें त्यांचें त्यांनाहि सांगतां आलें नसतें. पण त्यानंतर दोघेंहि जरी पार्टनर होऊन खेळलीं नाहींत तरी त्यांच्या उल्हसित वृत्तींवरून त्यांना आनंद वाटत असावा असा तर्क करण्यास लोकांना जागा मिळाली होती.

दुसरे लोक आतां बहुधा आपल्या निवडून आलेल्या पार्टनर-बरोबरच खेळत, पण या दोघांनीं मात्र आपला पूर्वीचाच हट्ट कायम ठेवला होता.

"तुम्ही दोघें पार्टनर होऊन प्रॅक्टिस कां करीत नाहीं?" म्हणून

त्यांना कुणीं कुणीं विचारलें सुद्धां. पण दोघांनीं "ऊं: खेळूं एकदमच. काय होईल तें होईल." असें उत्तर दिलें.

लवकरच सामने सुरू होऊन शरच्चंद्र आणि मालती यांच्या खेळण्याचा दिवस उगवला. सामने बघण्यासाठीं खूप प्रेक्षक खुर्च्यांवरून बसले होते. अंपायर्स पॉइंटस् मोजण्यासाठीं व आऊट वगैरे निकाल देण्यासाठीं कोर्टाच्या दोन बाजूला नेटजवळ खुर्चीवर उभे होते व आणखीहि कांहींजण आजूबाजूला तयार होते.

अशा सर्व समारंभांत चौघे खेळूं लागले. शरच्चंद्र आणि मालती यांची उल्हसित वृत्ति बघून सर्वांना गेम चांगली होणारसें वाटत होतें. आणि गेम रंगतहि चालली होती. प्रेक्षकांमधून टाळ्या, उत्तेजनपर शब्द सारखे ऐकूं येत होते. शरच्चंद्र आणि मालती यांचे अकरा झाले तरी प्रतिस्पर्ध्यांचे पांचच झाले होते. पण नंतर शरच्चंद्र–कां कोण जाणे–अस्थिरचित्त झाला. मालतीला नवल वाटलें. कारण मनाचा अतिशय निग्रह करून ती आज एकदांसुद्धां ओरडली नव्हती.

शरच्चंद्र चुकूं लागला तरी मालतीनें धीर सोडला नाहीं. यामुळें दोन्ही बाजूचे अठरा पॉइंटस् होऊन शरच्चंद्र आणि मालती यांनीं शेवटीं गेम जिंकली. प्रेक्षकांनीं टाळ्या वाजवून त्यांचें अभिनंदन केलें.

लगेच दोन्हीकडील प्रतिस्पर्ध्यांनीं बाजू बदलून दुसऱ्या गेमला सुरुवात केली. शरच्चंद्र प्रथमपासूनच वाईट खेळला. जेमतेम त्याचे तेरा पॉइंटस् झाले. प्रतिस्पर्ध्यांनीं चांगलीच गेम जिंकली. तिसरी गेम तेच घेणार यांत कुणालाहि शंका राहिली नाहीं. मालती अगदीं गुपचूप खेळत होती.

शरच्चंद्र ओशाळून गेला. पण मालती त्याच्यावर चांगलीच रागावली होती. सूड उगवण्यासाठीं शरच्चंद्र मुद्दाम वाईट खेळत आहे अशी तिची खात्री झाली. त्याच्या ठिकाणीं खिलाडू वृत्तीचा अभाव असल्याबद्दल तिला त्याची चीड आली.

पांच मिनिटें पेयपदार्थ व विश्रांति घेतल्यावर तिसऱ्या गेमला सुरुवात झाली. प्रतिस्पर्ध्यांचे आठ पॉइंटस् झाले तरी शरच्चंद्र–मालती यांचें कांहीएक झालें नाहीं. मालती शरच्चंद्राकडे बघत-सुद्धां नव्हती, इतकी ती त्याच्यावर रागावली होती. प्रेक्षकहि कंटाळल्यासारखे झाले.

आणि तितक्यांत स्तब्ध झालेल्या वातावरणांत ' आई ग ! ' म्हणून शब्द उमटला. मालतीच ओरडली होती. ती अगदीं मुद्दाम शरच्चंद्राला चिडविण्यासाठीं ओरडली असें कांहीं म्हणतां येणार नाहीं. पण तिच्या अंतर्मनानें तशाच कांहींतरी भावनेनें तिच्या तोंडून तो उद्गार काढला असावा. माणून मात्र मालतीनें मुद्दाम शरच्चंद्राकडे बघून हास्य केलें.

पण नवल हें कीं, शरच्चंद्र मुळींच न ।चिडतां मजा वाटून हंसला. त्याची मुद्रा प्रफुल्ल होऊन गेली. मालती आश्चर्यानें बघतच राहिली.

पण यापेक्षांहि तिला माणून शरच्चंद्राच्या खेळण्याचें आश्चर्य वाटलें. शरच्चंद्र इतका सुंदर खेळूं लागला कीं प्रेक्षकांमधून सारखे कौतुकोद्गार निघूं लागले. मालतीहि उत्साहानें खेळूं लागली. खेळ-तांना आणखी दोनतीन वेळां ती ' आई ग ! ' म्हणून ओरडली, पण शरच्चंद्र हंसतमुखानें खेळतच होता. मालती-शरच्चंद्रांनीं

दोन डाव घेतल्यामुळें त्या दिवशींच्या सामन्यांत तींच :दोघें विजयी झालीं होतीं.

दोघांचें अभिनंदन झाल्यावर शरच्चंद्र व मालती बरोबर घरीं जाण्यासाठीं निघालीं. विजयाच्या भरांत दोघेंहि राग विसरून गेलीं.

मालती हंसत म्हणाली, " तुम्ही म्हणजे एक कोडं आहांत कोडं ! "

शरच्चंद्र नुसता हंसला.

" काय, मी म्हणतें तें खरं आहे ना पण ? "

मालतीच्या बोलण्याचा ओघं शरच्चंद्राला पुरता कळून चुकला होता, पण त्यावर त्याच्याजवळ उत्तर नसल्यामुळें मुद्दामच त्यानें प्रश्न केला, "म्हणजे काय बुवा ? "

मालतीनें पिच्छा पुरवला. " म्हणजे काय असायचं ? पहिल्या दोन गेममधें असं कां खेळलांत ? "

" कुणाला माहीत काय झालं तें. "

" मीं इतका निग्रह केला होता. शब्द काढला नाहीं तोंडांतून. म्हटलं माझ्या कर्कश किंचाळण्यानें नर्व्हस शॉक नको बसायला. तरी पुन्हां वाईटच खेळलांत आणि तिसऱ्या गेमला ओरडलें तरी चांगले खेळलांत. "

शरच्चंद्रानें आतां मनाला धीर दिला. उत्तराशिवाय मालती ऐकायची नाहीं हें कळून येऊन तो म्हणाला, " खरं सांगूं कां ? पहिल्या दोन गेम्स्मध्यें तुम्हीं ओरडलां नाहीं म्हणूनच मला चुकल्या-चुकल्यासारखं होऊन खेळ जमेना. अन् तिसऱ्या गेमला तुम्हीं ओरडूं लागलां तेव्हां माझ्या मनाला उल्हसित वाटूं लागलं."

मालती हंसूं लागली, शरच्चंद्रहि हंसूं लागला. शरच्चंद्र म्हणाला, " बहुतेक परवां आपल्याला पुन्हां खेळावं लागेल. "

मालतीनें विचारलें, " मग काय म्हणणं आहे ? "

शरच्चंद्र मिस्किलपणानें म्हणाला, " सामना जिंकायची इच्छा असेल तर तुम्हीं किंचाळलं पाहिजे. 'आई ग ! ' म्हटलंत कीं मजा वाटते जरा."

मालतीनें केवढी तरी मान बेळावली, पण तिच्या मुखावर रागाची यत्किंचित् छटा नव्हती.

मालतीनें नंतर सहज म्हणून विचारलें, " आतां आणखी किती वेळां खेळायचं आपल्याला ? "

क्षणभर थांबून शरच्चंद्रानें उत्तर केलें, " नेहमींच. "

" म्हणजे काय याचा अर्थ ? "

" चल तुझ्या घरींच सांगतों. " शरच्चंद्रानें अशा तऱ्हेनें हंसून मालतीकडे बघितलें कीं तिला सर्व अर्थ कळून चुकला.

गोड हंसून मालतीनें प्रत्युत्तर दिलें.

---

# काळसर्पाचा विळखा

तें नांव ऐकल्यापासूनच अनुताईला कांहींतरी ओळखीओळखीसारखें वाटत होतें. तिनें आपल्या स्मृतिकपाटांत थोडीशी शोधाशोध करून पाहिलें, पण कांहीं आठवेना; म्हणून तिनें तो नाद सोडून दिला होता. परंतु आतां दवाखान्याच्या पायऱ्या चढून ती वर आली आणि तिनें दरवाजावर लावलेली पितळी पाटी पाहिली, तेव्हां पुन्हां तिच्या मनाला रुखरुखल्यासारखें वाटूं लागलें.

पाटीवर 'श्रीकृष्ण वामन टिळक, एम्. बी. बी. एस्.' अशीं काळीं अक्षरें रंगवलेलीं होतीं. संध्याकाळचे सोनेरी सूर्यकिरण त्याभोंवतालच्या पितळी पत्र्यावर पडून त्यांतूनहि पिवळे किरण परावर्तन पावत होते. जणूं ते एकमेकांना प्रेमानें भेटत होते.

ही कल्पना अनुताईच्या मनांत आली आणि एकदम तिच्या डोक्यांत प्रकाश पडला. 'खरंच कीं! हे गृहस्थ सहा वर्षांपूर्वी

आपल्याला ' बघायला ' आले होते. ' या आठवणीबरोबरच क्षणभरांत अनुताईला कितीतरी आठवणी आल्या.

इंग्रजी सहा इयत्ता झाल्यावर अनुताईला तिच्या आईवडिलांनीं परिचर्येच्या शिक्षणाकडे लावून दिलें होतें. शिक्षण चालू असतांच इकडे तिच्या लग्नाची खटपट चालूच होती. अनुताईला शंभरसवाशें ठिकाणीं तरी खचित दाखवली असेल. स्थळें पाहतां पाहतां अनुताईचें शिक्षणहि संपलें.

अनुताईला कोठेंहि दाखविली तरी तिचा थोरला भाऊ तिला त्या स्थळावरून चिडवूं लागे. तें चिडवणें त्या स्थळाचें फिसकटेपर्यंत चालू राहायचें.

कृष्णराव टिळक जेव्हां तिला पाहायला आले, तेव्हांदेखील दादानें " आतां काय बुवा, कृष्णरावाची रुक्मिणीबाई नाहींतर सत्यभामाबाई होणार तुम्ही ! एकदम डॉक्टरीणबाई होणार ! आहे बुवा !" असें चिडवायला सुरुवात केली होती. पण आईनें तें ऐकलें आणि ती एकदम दादावर संतापली—

" काय उगीच भलतंसलतं चिडवतोस तिला ! अनूला मी मुळींच त्या भिकाऱ्याला देऊं देणार नाहीं. नुसता एम्.बी.बी.एस्. काय करायचा ? त्याला ना घर ना दार ! "

टिळकांच्याकडून होकार येऊनहि तें स्थळ फिसकटलें. नंतर लगेच अनुताईचें लग्न विष्णुपंत आठवले यांच्याशीं झालें. विष्णुपंतांचें एक राहतें घर सत्तेचें असून त्यांना पन्नास रुपये भाडें येत असे. शिवाय त्यांच्या वडिलांची सावकारी चांगली चाललेली. पण विष्णुपंत मॅट्रिक परीक्षा दोनतीन वेळां नापास होऊन घरीं बसले होते. म्हणजे त्यांचा वेळ घरांत जात असे असें नाहीं; ते करम-

णुकीखातर बहुतेक वेळ घराबाहेरच घालवीत. याबद्दल अनुताईची आई म्हणाली होती, " लग्न झालं कीं येईल आपसुक ताळ्यावर. माझी मुलगीच त्याला शिकवील ! "

आणि लग्नानंतर खरोखरीच वर्षभर विष्णुपंत बायकोच्या अर्ध्या वचनांत वागले. वडिलांच्या धंद्यांतसुद्धां ते लक्ष घालूं लागले होते. अनुताईचे सासूसासरे म्हणत कीं, 'सुनबाई चांगल्या पायगुणाची आहे.'

पण अनुताईच्या दुर्दैवानें तिचा सासरा एक वर्षांतच कालवश झाला आणि नंतर वर्षसहा महिन्यांत सासूहि गेली. विष्णुपंत एकदम हातीं संपत्ति व सत्ता आल्यामुळें बेताल होऊन गेले. त्यांच्याभोंवतीं भुतावळ जमली आणि पुढील चार वर्षांत धंद्याचें तर वाटोळें झालेंच, पण शिवाय घरहि विकावें लागलें. बरेचसे दागिनेहि कर्जफेडीला गेले.

पश्चात्तापानें दग्ध होऊन विष्णुपंत नोकरीच्या शोधाला लागले. अनुताईच्या भावानें पोस्टांत खूप वशिला लावून नोकरी लावून दिली होती; पण एक महिन्यांतच निष्काळजीपणा आणि उद्दामपणा यांबद्दल त्यांना कमी करण्यांत आलें होतें. अनुताईच्या भावानें संतापून मेहुण्यांचें तोंडहि न पाहण्याचा निश्चय केला. त्या संतापाची झळ अर्थातच अनुताईला भोगणें भाग होतें.

अनुताईचे आईवडील तिचे हे दुर्दैवाचे दिवस पाहण्यास जगले नाहींत याबद्दल अनुताईला फार बरें वाटे. परंतु मायेच्या माणसांच्या अभावीं तिला एकटीलाच आपलें दुःख सहन करावें लागे.

तसे विष्णुपंत अनुताईशीं पहिल्यापासूनच चांगले वागत. त्यांच्या बोलण्यावागण्यांत लाघवीपणा व गोडवा फार होता. ती कितीहि त्यांच्यावर रागावलेली असो, विष्णुपंत एकदां गोड बोलूं लागले,

कीं अनुताईला त्यांचें सर्व बोलणें खरें वाटे. पण मनाच्या फसण्याला-सुद्धां अंत असतोच. विष्णुपंतांच्या बोलण्यावागण्याची तिला चीड येऊं लागली. त्यांनीं नोकरी घालवल्यावर अनुताईचे दागिनेहि विकण्याला सुरुवात केली होती. इतकें झालें तरी त्यांच्या व्यसनांना आळा नव्हताच !

'मी नोकरी पाहतें' असें अनुताईनें सुचविल्याबरोबर मात्र विष्णुपंतांचा स्वाभिमान खडबडून जागा झाला. "काय! माझ्या बायकोनं नोकरी करायची अन् मीं खायचं! मला काय समजतेस तूं?" अशा प्रकारें संतापून ते बोलूं लागतांच अनुताईनें नोकरीचें नांव सोडून दिलें. तिच्या अंगावर आतां दागिने म्हणजे हातांतल्या दोन बांगड्या तेवढ्या होत्या. त्या विकण्याची वेळ लौकरच येणार या धास्तीमुळें मात्र अनुताईला धैर्य आलें. विष्णुपंतांना तिनें अगदीं निक्षून सांगितलें कीं, 'मी नोकरी पाहणार.' हळूहळू तिनें चौकशीला सुरुवात केली. विष्णुपंतांची रागवारागवी सुरूच होती; पण अनु-ताईनें तिकडे लक्षच दिलें नाहीं.

कालच अनुताईला एका ओळखीच्या सद्गृहस्थानें "डॉक्टर टिळकांना त्यांच्या प्रसूतिगृहासाठीं आणखी एक परिचारिका पाहिजे आहे; तेथें मीं तुमच्याकरितां शब्द टाकला तर वायां जाणार नाहीं; तुम्ही एकदां त्यांना भेटून या," असें सांगितल्यावरून ती आज आली होती.

पाटीवरील नांवाची ओळख पटतांच अनुताईच्या मनांत विचार आला, "ज्यांना भिकारी म्हणून नाकारण्यांत आलें, त्यांच्याच दाराशीं आज मी नोकरीची भिक्षा मागण्यासाठीं आलें आहें. काय नशिबाचा फेरा हा!"

एक निःश्वास टाकून अनुताईनें दरवाजांत पाऊल टाकलें. तिची सावली खोलींत दरवाजांतून आलेल्या उन्हांत लांबवर गेली. डॉक्टर टेबलाशीं वाचीत बसले होते. सावली बघून ते म्हणाले, "कोण आहे ? आंत या."

अनुताईनें खोलींत प्रवेश केला. अगदीं तेच ते ! तोच श्यामल वर्णाचा रेखीव सुंदर चेहरा, तें भव्य कपाळ, ती सदैव हंसणारी जिवणी आणि ती हनुवटीवरील खळगी, काळ्याभोर केसांचा तो भांग. शरीरयष्टि सडपातळ पण कशी बांधेसूद ! फ्लॅनेलच्या विजारीवर शुभ्र शर्ट व नेकटाय, कॉलर. मुद्रेवर अधिकाराचा रुबाब व आत्मविश्वास उमटलेला.

'हेच ते पूर्वीचे गरीब श्रीकृष्ण आणि हा माझा अवतार ! तीन रुपयांचं पातळ नेसून ही अनुताई आली आहे.'

पण श्रीकृष्णाला तें तीन रुपयांचें अस्मानी भुई व हिरवेगार कांठ असलेलें पातळच अतिशय सुंदर वाटलें. अनुताईच्या तांबूस गौरवर्णाला तें खरोखरच खुलत होतें. श्रीकृष्णाच्या मनांत कल्पना आली—झाडांमधून दिसणाऱ्या निळसर आकाशांत उषादेवीचें आरक्त मुखमंडल शोभतें तशीच ही दिसते आहे. पण अवेळीं आलेल्या ढगाप्रमाणें दुःखामुळें ही उदास दिसते आहे. जणूं तिचें दुःख शोधण्यासाठींच श्रीकृष्णानें अनुताईकडे नीट निरखून पाहिलें. एकदम आश्चर्य, आनंद आणि निराशा या भावनांनीं त्याच्या मुखावर गर्दी केली. अनुताईच्या गोऱ्या कंठांत तिचें मंगळसूत्र फारच उठून दिसत होतें.

पण सर्व आवेग क्षणभरांत आंवरून श्रीकृष्ण पुढें आला व एक खुर्ची दाखवून हंसतमुखानें म्हणाला, "बसा."

डॉक्टरांनीं आपल्याला पूर्णपणें ओळखलें हें पाहून अनुताईचें धैर्य पार नाहींसें झालें होतें. त्यांच्या नांवाची ओळख पटल्याबरोबरच आपण निघून कां गेलों नाहीं, याबद्दल तिला स्वतःचाच राग आला. पूर्वीच्या गोष्टी आठवल्यावर डॉक्टर आपल्याला नोकरी देतील तरी कसे ?

पण आतां काय इलाज होता ? ती खालीं मान घालून भीत-भीतच म्हणाली, " मला पाठकांनीं आपल्याकडे पाठवलं आहे. प्रसूतिगृहांत आणखी एक नर्स हवी आहे म्हणून त्यांनीं सांगितलं. त्या जागेकरितां मी आलें आहें. "

" हं हं ! आलं लक्षांत. कमलाबाई आठवले असं नांव सांगितलं पाठकांनीं मला. "

" हो. माझंच नांव तें." अनुताईनें सांगितलें.

दुसऱ्या क्षणीं श्रीकृष्णानें प्रश्न केला,

" तुमचं माहेरचं नांव अनुताईच ना ? " श्रीकृष्णाच्या स्वरांत कंप होता.

अनुताईला वाटलें, डॉक्टर रागावून आपल्याला पूर्वप्रसंगाची आठवण देऊन, " नोकरी नाहीं " म्हणून सांगणार. खिन्नपणानें ती उत्तरली, " हो, वैद्यांची मुलगी मी."

श्रीकृष्ण क्षणमात्र स्तब्ध बसला. नंतर तो म्हणाला. " पाठकांचा शब्द मला वडिलांच्या शब्दाप्रमाणं आहे. मी तुम्हांला नेमून घेतों माझ्या नर्सिंग होममध्यें. "

निव्वळ पाठकांच्या शब्दाखातर डॉक्टरांची अनिच्छा असतांहि त्यांनीं आपल्याला नेमावें हें अनुताईला बरें वाटेना. डॉक्टरांना एखादी पळवाट सुचवावी म्हणून ती म्हणाली, " मी परिचर्येची

परीक्षा पास झालेली आहें, पण मला कामाचा तसा अनुभव मात्र नाहीं."

"नसेना का. आमच्या दुसऱ्या नर्स गोदूताई फार हुषार आहेत आणि स्वभावानेंहि चांगल्या आहेत. त्या केव्हांच तुम्हांला तयार करतील. अन् मीसुद्धां वेळ मिळेल तेव्हां तुम्हांला समजावून सांगेन. तुम्हीं कांहीं काळजी करूं नका."

अनुताई आश्चर्यमूढ झाली. डॉक्टरांचे आभार मानण्याचा तिनें प्रयत्न केला, पण ते ऐकूनहि घेईनात.

अनुताई अत्यंत उल्हसित वृत्तीनें घरीं आली. तिचीं पावलें जणूं अधांतरीं पडत होतीं. स्वैंपाक करतांना शुभसूचक म्हणून तिनें रव्याची खीरहि केली. स्वैंपाक आटपून ती अधीर मनानें विष्णुपंतांची वाट बघत बसली. विष्णुपंत रात्रीं अकराला घरीं आले. त्यांच्या तोंडाला दारूचा वासहि येत होता.

पानें मांडून दोघें बरोबरच जेवावयास बसलीं. विष्णुपंत नेहमींप्रमाणेंच लाघवीपणानें 'नोकरीची खूप खटपट केली, पण काम मिळत नाहीं' वगैरे बोलत होते, अनुताईला त्यांतलें एक अक्षरसुद्धां खरें वाटलें नाहीं. पण आज तिची वृत्ति प्रसन्न असल्यामुळें ती रागावली नाहीं. डाव्या हातानें विष्णुपंतांच्या पानांत खीर वाढतां वाढतां तिनें सांगितलें, "आतां किनई, इतकी काळजी करायचं कांहीं कारण नाहीं. मला उद्यांपासून डॉ. टिळकांच्या नर्सिंग होममधें नोकरी लागली आहे. चाळीस रुपये पगार मिळणार आहे. त्यासाठींच ही खीर केली आहे."

अनुताईचें लक्ष खीर वाढण्याकडे असल्यामुळें विष्णुपंतांच्या क्रोधाचा पारा चढत होता हें तिच्या लक्षांत आलें नाहीं. विष्णु-

पंतांनीं अनुताईच्या हाताला धक्का मारून तिच्या हातांतली डाव उडवून दिली आणि तस्से ते पानावरून उठले. लगेच कपडे करून ते घराबाहेर चालते झाले.

अनुताई खूप रडली. रात्रभर तिच्या डोळ्याला डोळा लागला नाहीं! पण सकाळीं उठून तयारी करून सांगितलेल्या वेळेला ती दवाखान्यांत नोकरीवर रुजू झाली.

एक वाजतां जेवण्यासाठीं म्हणून ती घरीं निघाली तेव्हां विष्णुपंत अजून घरीं आले असतील कीं नाहीं, या विचारानें तिच्या जिवाची कालवाकालव चालली होती! पण बिऱ्हाडाशीं ती येते तों तिला दार उघडें दिसलें. अनुताईला एकदम हलकें वाटलें. ती घरांत गेली तों विष्णुपंतांनीं सहास्य वदनानें तिचें सप्रेम स्वागत केलें.

" या राणीसरकार! जेवण तयार आहे. "

खरोखरच विष्णुपंतांनी पिठलें-भात तयार करून पानें मांडून जेवणाची तयारी केली होती.

" इश्श! कशाला इतके श्रम घेतले ते! उद्यांपासून आपण डबाच आणूं या खाणावळींतून," असें अनुताई लटक्या रागानें म्हणाली.

पण कित्येक वर्षांत अनुताईनें इतका सुखाचा दिवस अनुभवला नव्हता!

आणि त्यानंतरचें वर्षसुद्धां सुखाचा वर्षाव होत असल्याप्रमाणें अनुताईला गेलें. डॉक्टर म्हणजे तिला देवाप्रमाणें वाटत होते. विनोदी आणि प्रेमळ स्वभावाच्या डॉक्टरांचा सहवास तिचा सर्व शीणभार नाहींसा करी. तिला काम करण्यास हुरूप देई.

दवाखान्याचें काम खूपच वाढलें होतें. गोदूताई अनुताईला चेष्टेनें म्हणत, " अनुताई, हा तुमचा पायगुण बरं. आज पांच वर्षं मी या दवाखान्यांत आहें, पण या वर्षाइतकं काम कधीं नाहीं करावं लागलं. "

पण या बोलण्यांत आंतून आनंद असे. कारण प्रसूतिगृहांतील स्त्रियांची संख्या वाढल्यापासून या दोघींचाहि पगार दहा दहा रुपयांनीं वाढला होता.

डॉक्टरांना दवाखान्याखेरीज जसें कांहीं सुचतच नसे !

गोदूताईनीं अनुताईला प्रथमच डॉक्टरांसंबंधीं माहिती सांगितली होती. गोदूताई म्हणाल्या होत्या, " डॉक्टर एम्. बी. बी. एस्. झाल्यावर म्हणे लग्न करण्याच्या विचारांत होते; पण गरीब म्हणून त्यांना कुणीं नकार दिला. अर्थात् मुलीच्या मंडळींनीं त्यांना असं स्पष्ट नाहीं सांगितलं; पण कर्णोपकर्णीं ती बातमी डॉक्टरांच्या कानांवर आली. तेव्हांपासून डॉक्टरांनीं निश्चय केला कीं खूप पैसा मिळवीन अन् मगच लग्न करीन. म्हणून त्यांना पुष्कळ मुली सांगून आल्या. अजूनसुद्धां पुष्कळ हुंडा देऊन नक्षत्रासारख्या मुली डॉक्टरांना सांगून येतात; पण ते आतां चिकित्साच फार करतात. त्यांच्या मनांत ती पहिली मुलगी फार भरली होती म्हणे. "

अलीकडे गोदूताई थट्टेनें म्हणत, " आतां नाहीं डॉक्टर लग्न करणार. आपल्या धंद्याशींच त्यांनीं लग्न केलेलं दिसतंय्. कामावांचून त्यांना जसं कांहीं सुचतच नाहीं ! "

पण अनुताईला मधूनमधून वाटे, " डॉक्टर कामासाठींच का दवाखान्यांत इतका वेळ काढतात ? आपल्या सहवासाची ओढ त्यांना वाटते असं तर नसेल ना ! अन् आपल्याला देखील— "

दवाखान्यांत आनंदाचें साम्राज्य, तर घरांत दुःखाचें साम्राज्य पसरल्यासारखें अनुताईला भासे. प्रथम तिनें आपला सर्व पगार पतीच्या हवालीं केला, पण घरखर्चाला त्यांतून फारसें कांहींच मिळेना. तेव्हां अनुताईनें विष्णुपंतांच्या हातीं पगार देण्याचेंच नाकारलें. त्या वेळीं विष्णुपंतांनीं कहर केला! पण लगेच ते नरमले. नंतर त्यांनीं पत्नीकडून गोड बोलून, रागावून, मिळतील त्या तऱ्हेनें मिळतील तितके पैसे काढण्याचा उद्योग चालू केला. नोकरीचें नांवहि त्यांनीं सोडून दिलें. अनुताईला या सर्व प्रकाराचा वीट आला होता.

अशा परिस्थितींत दिवस गेल्याचें अनुताईच्या लक्षांत आलें, तेव्हां तिला अतिशय दुःख झालें. हीच गोष्ट पूर्वी घडली असती तर सासूसासऱ्यांना केवढा आनंद झाला असता! आपल्याला देखील मुलाची किती हौस होती! पण आतां नोकरी जाणार! मग खायचें काय? आपल्या बाळाचें लालनपालन कसें करायचें?

महिनाभर अनुताईला अगदींच बरें वाटेना, म्हणून तिनें रजा घेतली. नंतर ती पुन्हां कामावर आली. पुढें लागणाऱ्या खर्चासाठीं पैसापैसा करून अनुताई पैसे सांठवीत होती. पण सातव्या महिन्यांत ती एके दिवशीं तापानें फणफणून पडली. लवकरच ती अकालीं प्रसूत झाली.

श्रीकृष्णाला ही बातमी समजतांच तो स्वतः अनुताईच्या घरीं गेला आणि काळजीपूर्वक तिला दवाखान्यांत घेऊन आला. त्यानें तिची व्यवस्था एका स्वतंत्र खोलींत केली.

श्रीकृष्णाचा जीवच जणूं त्या खोलींत गुंतून पडला होता. चार दिवस अनुताई बेशुद्धावस्थेंत होती तर त्याला जेवण सुचलें नाहीं कीं झोंप सुचली नाहीं!

विष्णुपंत दिवसां कांहीं तास बसून जात; पण इतर उद्योगांतच त्यांचें चित्त जास्त असे.

पांचव्या दिवशीं पहांटेच्या वेळीं श्रीकृष्ण अनुताईच्या पलंगा-जवळच बसला होता. तिच्या केसांवरून तो हलुवारपणें हात फिरवीत होता. निराशेनें त्याचें मन व्याकुळ झालें होतें. त्या निराशेच्या भरांत त्यानें हांक मारली,

" अनु...अनु ! "

ती श्रीकृष्णाची हांक ऐकूनच जणू अनुताईनें डोळे उघडले. श्रीकृष्णाला बघून तिच्याहि म्लान मुखावर हास्यरेषा चमकल्या.

अनुताईला शुद्धीवर आलेली पाहून श्रीकृष्णाला इतका आनंद झाला, कीं अनुताईच्या हातावर मस्तक ठेवून तो रडला. अनुताईनेंहि आपल्या क्षीण झालेल्या हातांनीं त्याचे अश्रु पुसण्याचा प्रयत्न केला.

नंतर अनुताईला आठवण झाली, " कुठं आहेत हे ?"

हे शब्द ऐकतांच बाण हृदयांत शिरल्याप्रमाणें श्रीकृष्ण व्याकुळ होऊन बाजूला सरला. घोगऱ्या आवाजांत तो म्हणाला,

" मी त्यांना बोलावणं पाठवतों. "

लगेच तो खोलीबाहेर पडला. पण त्याच्या हृदयांत निव्वळ अंधकारच नव्हता. अनुताईचेंहि आपल्यावर प्रेम आहे ही गोष्ट आतां त्याला कळून चुकली होती.

आणखी महिनाभर अनुताई दवाखान्यांत होती. त्या वेळीं अनुताईला पूर्णपणें कळून चुकलें कीं, विष्णुपंतांच्यावर आपण कधींहि केलें नाहीं असें शुद्ध, अवर्णनीय आणि मनोहर असें प्रेम आपण श्रीकृष्णावर करीत आहों.

जाण्याच्या आदल्या दिवशीं श्रीकृष्णाला राहवेना. दुःखभरानें त्यानें अनुताईचे हात आपल्या हातांत घट्ट धरून विचारलें, "अनु, जाणार तूं!"

"मग काय करणार तर!" अनुताई निराशापूर्ण स्वरानें म्हणाली.

"खरंच. काय करणार! अनु, तूं माझ्या दवाखान्यांत आल्या दिवसापासून तुझ्या प्रेमानं माझं हृदय परिपूर्ण भरून गेलं. तुझ्या संसाराचा झालेला खेळखंडोबा पाहून मला अतोनात वाईट वाटतं. माझी कीर्ति, माझा पैसा, अनु, मीच तुझा आहें. तुझ्यावांचून बाकीच्या सर्व गोष्टी मला तुच्छ आहेत. तुझ्यावांचून मी काय करूं?"

"श्रीकृष्ण, तुम्हीच असा धीर सोडलात तर माझी काय अवस्था होईल? नशीब म्हणून कपाळावर हात मारण्यावांचून आहे कां कांहीं त्याला उपाय?"

"नशीब!" श्रीकृष्ण उपहासानें हंसला. "नशीब नाहीं तर काय! काळसर्पाप्रमाणें या विष्णुपंतांच्या नांवानं बांधलेलं हें मंगळसूत्र तुझ्या गळयाला जन्माची मगरमिठी घालून बसलं आहे. ती मिठी या जन्मांत सुटणार नाहीं!" श्रीकृष्ण बेभानपणें म्हणाला. "टाक ना तें तोडून, अनु, टाक ना तें तोडून!"

"श्रीकृष्ण, नका असं बोलूं. असा धीर सोडून कसं चालेल? केवढं कार्य पडलं आहे तुमच्यापुढं. माझ्या सुखासाठीं तुम्हीं खूप नांवलौकिक मिळविला पाहिजे."

"पण अनु, तूं माझ्या दवाखान्यांत काम करशील ना? जाणार नाहींस ना नोकरी सोडून? एक महिन्यानं येशील ना तूं?"

श्रीकृष्णाप्रमाणें अनुताईलाहि ती कल्पना असह्य वाटली. पण तिच्या मनांत भीतीचा उदय झाला.

" मी दवाखान्यांत आलें तर आपली दोघांची नित्यपरिचयानं काय अवस्था होईल ? त्यापेक्षां आपण दूर राहून बिसरण्याचा प्रयत्न केला तर......"

" दूर राहून तूं विसरूं शकशील मला ? "

" नाहीं, नाहीं, कधींच नाहीं. श्रीकृष्ण, मीं तुम्हांला कधीं कधीं विसरणं शक्य नाहीं."

" मग आपण सहवासाचं सुख तरी कां मिळवूं नये ? राहणार ना तूं नोकरीवर ? "

अनुताईनें मानेनेंच होकार दिला. श्रीकृष्णानें तिला जवळ ओढून तिचें चुंबन घेतलें.

* * *

अनुताई हवा पालटण्यासाठीं आपल्या भावाकडे गेली होती. तेथून ती एक महिन्यांतच परत आली. ती आल्यावर विष्णुपंतांनीं सांगितलें, " तुझ्याकरितां एका इस्पितळांत मीं नोकरी पाहिली आहे."

अनुताईला चमत्कारिक वाटलें. " पण माझी पहिली नोकरी आहेच कीं ! मग उगीच दुसरी कशाला पाह्यची ?"

त्यावर विष्णुपंत उपहासानें हंसून म्हणाले, " तेथल्या गोदूताईनीं मला थोड्या सूचना दिल्यावरूनच ही दुसरी नोकरी मीं शोधली, समजलीस ? माझी अब्रू मला संभाळली पाहिजे."

अनुताईला धक्काच बसला !

" गोदूताईनीं काय सांगितलं ? "

" तुमचं आणि त्या डॉक्टरांचं फार प्रेम जमलं आहे म्हणून. पण प्रेमाचा धांगडधिंगा घालायला ही अमेरिका नव्हे. हिंदुस्थानांत चांगली ब्राह्मणकुळांत जन्मली आहेस तूं. नवऱ्याचा कंटाळा आला कीं काडीमोड करून चालली दुसऱ्याकडे ! असले प्रकार कांहीं इथं शक्य नाहींत. मी जिवंत आहें तोंपर्यंत तूं माझी बायकोच राहणार ! समजलीस ? "

अनुताईंचें मस्तक सुन्न होऊन गेलें होतें. तिला भास झाला कीं, विष्णुपंतांचा एकेक शब्द म्हणजे एकेक जळता निखारा असून ते आपल्या हृदयावर ते निखारे चितेप्रमाणें रचीत आहेत, त्यामुळें आपल्या हृदयाची निखाऱ्याबरोबरच राख झाली असून त्या राखे-वरून काळ्याभोर सापाचें एक पिल्लू सरपटत चाललें आहे.

भ्रमांत असल्याप्रमाणें तिनें मंगळसूत्राला हात लावला. ती पुटपुटली, " हो, हो. मी तुमचीच बायको राहणार. जन्मभर मी तुमचीच राहणार. कारण हें तुम्हींच माझ्या गळ्यांत घातलं आहे ! "

---

# पत्रांची अदलाबदल

पत्रांची अदलाबदल ! केवढी विलक्षण पेंचाची परिस्थिति ती ! ज्या दोघांना अशीं बदललेलीं पत्रें गेलीं असतील त्यांना तर चमत्कारिक होऊन जातेंच, परंतु ज्याच्या हातून ही चूक, चूक नव्हे, घोडचूक, झाली असेल त्याला तर काय मेल्यापेक्षां मेलें होऊन जातें.

अरविंदानें अशीच चूक करून ठेवली होती. पाकिटावर पत्ते घालून आंत पत्रें घालतांना जी अदलाबदल झाली ती त्याच्या न कळत त्याच्या मनावर उमटली असली पाहिजे. कदाचित् त्याच वेळीं विचारांनीं चूक सुधारण्यासाठीं त्याच्या मेंदूला धक्केहि दिले असावे. परंतु इतर विचारांच्या हलकल्लोळांत या विचारांचे प्रयत्न विफल ठरले. पत्रें टपालांत पडलीं तीं ज्यांचीं त्यांना नव्हे, ज्यांचीं नव्हतीं त्यांना पोंचलींहि. आणि मग इतका वेळ चाललेल्या त्याच्या मनाचे प्रयत्न

सफल होऊन त्याला एक धक्का बसला. पत्रें टपालांत टाकल्यापासूनच त्याला कसेंतरी वाटत होतें, पण तें वाटणें त्यानें मजकुराकडे लावलें होतें. पण आतां त्या वाटण्याचा खरा अर्थ त्याच्या ध्यानांत येऊं लागला. आपण अशी अदलाबदल केली कीं काय अशा शंका मनांत येण्यापासून तों त्या दृढ होईपर्यंत त्याच्या विचारांचें परिवर्तन होत गेलें.

अरविंदाला दे माय धरणी ठाय होऊन गेलें. तीं पत्रें म्हणजे कांहीं दोन मित्रांना लिहिलेलीं औपचारिक पत्रें नव्हतीं किंवा आईबहीण या दोघींना लिहिलेलीं नव्हतीं. तसें असतें तर पत्रांच्या अदलाबदलीचें अरविंदाला विशेष कांहींच वाटलें नसतें.

पण अरविंदानें अदलाबदल केलेल्या पत्रांतील एक त्याची आधींची वर्गभगिनी व पुढें प्रेमदेवता बनलेली सुलभा हिला लिहिलेलें होतें आणि दुसरें त्याचे पितृतुल्य चुलते दामोदरपंत यांना लिहिलेलें होतें. आणि सुलूचें पत्र काकांना आणि काकांचें सुलूला अशी ही परिस्थिति निर्माण झालेली होती.

चूक लक्षांत येतांच दोघेंहि तीं पत्रें वाचणार नाहींत अशी आशा अरविंद उरींपोटीं कवटाळूं लागला. पण ती आशा तो जसजशी बळकट करूं लागे तसतशी अंधुकच होत होती. तेव्हां तो डोक्याला शीण देऊन विकारांच्या भरांत भरकटलेलीं वाक्यें आठवीत होता.

इकडे सुलूनें चूक लक्षांत आल्यावरहि काकांचें पत्र सरळ वाचून काढलें होतें. 'मग माझ्याबद्दल जर त्यांत लिहिलेलं आहे तर मला नको कां वाचायला?' अशा सबबीवर तिनें आपल्या सदसद्विवेक-बुद्धीला चूप बसविलें होतें.

पहिलें वाक्य वाचून सुलूचें मुख कोमेजून गेलें. पुढें त्यावर आनंद, आदर व प्रेम या भावनांची छटा प्रतिबिंबित झाली आणि शेवटीं सर्व भावनांचा वेग मनाला सहन न होऊनच कीं काय, तिच्या नेत्रांवाटे अश्रू वाहूं लागले. अश्रुपूर्ण नेत्र वरचेवर पुसून सुलू तें पत्र पुनःपुन्हां वाचीत होती.

"काका, मीं सर्व गोष्टींचा नीट विचार केला. तुमच्या आज्ञेप्रमाणें मी दामल्यांच्या मुलीबरोबर लग्न करण्यास तयार आहें. परंतु हें मात्र मी आधींच स्पष्ट-सांगून ठेवतों कीं– मी तें तुम्हांला वरचेवर सांगत आलोंच आहें; पण पुन्हां एकवार शेवटचें सांगतों– सुलूशिवाय दुसऱ्या कोणत्याहि मुलीशीं लग्न करून मला सुख लागणार नाहीं. पत्नीविषयक कर्तव्यांत मी उणें पडूं देणार नाहीं, असें मी वचन देतों. पण कर्तव्यापेक्षांहि श्रेष्ठ अशा हार्दिक प्रेमाचा लाभ तिला होणार नाहीं. चार महिन्यांत मी सुलूला विसरेन असें जें तुम्हांला वाटतें आहे तें शक्य नाहीं. पण याबद्दल जबाबदारी घेऊनच तुम्ही काय तें ठरवा.

तुमचा आज्ञांकित,
अरविंद."

इकडे दामोदरकाकांनीं दहा वेळां सुलूचें पत्र न वाचण्याचा निश्चय करून तें बाजूला ठेवून दिलें. पण अरविंदावरील त्यांचें प्रेम त्यांना अनावर झालें. त्यांची हिताकांक्षा त्यांना त्या पत्राकडे ओढूं लागली. शेवटीं सदसद्विवेकबुद्धीच्या टोंचणीमुळें थरथरणाऱ्या हातांनीं, धडधडणाऱ्या हृदयानें व लज्जानम्र मस्तकानें काकांनीं तें पत्र वाचून तर टाकलें.

" सुलू, आपल्या उभयतांच्या सुखाला मी आज स्वहस्तें भडाग्नि देण्याला सिद्ध झालों आहें. काकांनीं पोटच्या मुला-पेक्षांहि माझ्यावर अधिक प्रेम केलें. माझ्या आईवडिलांच्या माणून त्यांनींच लहानपणापासून माझें लालनपालन व विद्या-भ्यास केला हें तुला माहीतच आहे. त्यांना तुझ्याबद्दल मी पुष्कळ सांगितलें, पण ' लहानपणचे भरकटलेले विकार ' असें म्हणून, ते आपल्या प्रेमाची चेष्टा करतात. तूं शिकलेली, एवढें कारण तुझ्याविषयीं गैरसमज करून घेण्याला काकांना पुरेसें वाटतें. पण हें पुन्हां पुन्हां कशाला लिहूं ? काकांनीं मला काल निर्वाणीचा सवाल टाकला. मीं विचार केला. सुलू, एक वेळ जन्मदात्या पित्याची अवज्ञा माझ्या सुखाखातर मीं केली असती, पण काकांची अवज्ञा करणें मला अत्यंत कृतघ्नपणाचें वाटतें. त्यांनीं माझ्याकरितां जे कष्ट केले तें ऋण फेडण्यासाठीं मला माझ्या सुखाचा बळी द्यावा लागला तरी हरकत नाहीं.

निव्वळ मनोधैर्याचा प्रश्न असता तर गोष्ट वेगळी. पण कर्तव्याच्या कैचींत सांपडल्यावर आतां मी तरी काय करूं ?

सुलू, तूं मला क्षमा करशील का ? छे, तशी आशा मीं कां बरं बाळगावी ? पण——पण तरी देखील अशी आशा वाटते कीं, तुझें थोर हृदय माझ्या कृतीला हीन ठरवणार नाहीं. ही माझी आशा जर खरी ठरली तर माझ्यापुढील कटु कर्तव्य मला थोडें तरी सहन करण्याचा धीर होईल.

सुलू, कांहीं झालें तरी मी तुला विसरणार नाहीं. आजपर्यंत प्रेमदेवता म्हणून तुला माझ्या हृदयांत स्थान होतें, आतां यापुढें माझ्या मनोमंदिरांत आराध्यदेवता म्हणून तुला स्थान मिळेल.

पण सुलू, मी आतां तुझ्या स्मृतींत राहण्याला अयोग्य आहें. माझ्या अपराधाबद्दल देवानें तुला प्रायश्चित्त देऊं नये, एवढेंच माझें अंतःकरणपूर्वक मागणें आहे. सदैव तुझाच,

अरविंद."

सर्व पत्र वाचून काकांच्या मनाची खळबळ उडालीच, परंतु स्वतःसंबंधींचा मजकूर वाचून त्यांच्या विचारांचा खळबळाटच उडाला. त्यांतल्या त्यांत 'एक वेळ जन्मदात्या पित्याची अवज्ञा माझ्या सुखाखातर मीं केली असती, पण काकांची अवज्ञा करणें मला अत्यंत कृतघ्नपणाचें वाटतें.' हें वाक्य वाचून तर त्यांच्या हृदयाला घरे पडले. त्यांच्या सर्व विचारांना त्या वाक्यानें जणूं कलाटणीच मिळाली. 'किती केलें तरी एकूण जन्मदाता पिता आणि जोडलेला पिता—अगदीं पित्याचा भाऊ कां असेना मग तो—यांच्यांत फरक आहेच तर ? अरविंदाला पितृकर्तव्यापेक्षां आपल्या-विषयींचें कठोर कर्तव्य पाळण्याची जरूर जास्त असावी का ? मी अरविंदाचा पिता असतों तर त्यानें सुलभेशीं लग्न केलें असतें. कां बरं ? प्रथम बापानें आपल्याला घराबाहेर काढलें तरी पुढें केव्हां तरी प्रेमाखातर सर्व राग विसरून आपल्याला जवळ करील ही खात्री तर त्या वाक्यांत ध्वनित नसेलना ?'

काकांना हें वाक्य लागलें. त्या वाक्यानें आजवरच्या त्यांच्या अभिमानाला धक्का बसला होता. अरविंदावर मीं पोटच्या मुला-प्रमाणें प्रेम केलें आणि त्याचें प्रेम संपादन केलें याबद्दल त्यांना जी धन्यता वाटत असे, तिच्यावर त्या वाक्यानें आघात केला. निदान अरविंदाच्या मनांत असा दूरचा भाव उत्पन्न होण्याजोगें काय बरें झालें ?

मुलाच्या प्रेमानें पिता जर अभिमान टाकतो, मुलाच्याच हिता-खातर बाळगलेल्या आकांक्षा दूर लोटूं शकतो तर मीं तसें कां करूं नये ? बस्स, पित्याच्या बरचढ माझी कृति झाली पाहिजे. ही पत्रांची अदलाबदल ईश्वराच्या कृपेनेंच झाली म्हणायची. अरविंदाचें त्या मुलीवर मनापासून प्रेम दिसतें. ती मुलगी कशी काय आहे हें पाहिलं पाहिजे एकदां.

मनांत येण्याचा अवकाश, काका लगेच उठले आणि कपडे करून सुलभेकडे निघाले. अरविंदाच्या सांगण्यावरून तिचा पत्ता त्यांना माहितच होता. तेव्हां ती पंचाईत पडलीच नाहीं. रामा गडी अरविंदाचा निरोप वगैरे घेऊन सुलूकडे जात असे म्हणून त्यांनीं त्याच्याजवळ जरा नीट चौकशी केली.

दामोदरकाकांनीं कॉलेजच्या हॉस्टेलमध्यें जाऊन विचारलें. सुलभेकडे कोणी वृद्ध गृहस्थ आल्याचें बघून तिला व तिच्या मैत्रि-णींना मोठें आश्चर्य वाटलें. तिच्या खोलींत राहणाऱ्या मुलीनें तर जातां जातां थट्टासुद्धां केली, “ काय सुलू, कांहीं वेगळीच गडबड वडिलांनीं सुरू केलीय कीं काय ? ”

दारांत येऊन सुलूनें दामोदरकाकांना सहास्य मुद्रेनें “ या आंत, बसा,” असें मोठ्या विनयानें म्हणून एका खुर्चीकडे बोट केलें व स्वतः तीहि एका खुर्चीवर बसली.

एवढ्या वेळांत अगोदर काकांनीं सुलूला बघून घेतलें होतें. निळ्या कांठाचें जास्वंदीच्या फुलाप्रमाणें रक्तवर्ण पायघोळ पातळ, तसलाच बिनबाह्यांचा गळ्याजवळ बराचसा काप असलेला ब्लाउज, दोन भुंवयांच्या मध्यवर्ती बारीकशी कुंकवाची टिकली, तेलाच्या अभावीं पिंगट दिसणारे व भुरभुर उडणारे केस, त्यांची फुगीर

रचना, पाठीवर रुळणारी रिबन लावलेली लांब वेणी, हातांतल्या केसासारख्या बारीक फक्त दोन सोन्याच्या बांगड्या, डाव्या हातांतलें घड्याळ—हा सर्व जामानिमा काकांच्या आधींच्या सर्व कल्पनांशीं अगदीं जुळता होता. झालंच तर, सुलू दिसण्यांत कुठें सुंदर होती ? पावडर लावली म्हणून वर्ण थोडाच गोरा होतो ! त्यावर धूसर छटा येते तेवढीच. बाकी सुलू एक प्रकारें चांगली दिसत होती, हें काकांना मनाशीं कबूल करावें लागलें.

पण एवढी मोठी मुलगी आणि अल्लडपणा किती तिच्यांत ! काय तें थिल्लर चालणें आणि वसावसा इकडेतिकडे करणें ! परक्यासमोर इतकी हंसरी मुद्रा कशाला !

'छेः ! असल्या मुलीशीं लग्न करून अरविंद कसा सुखी होईल ?' पण काकांना पुन्हां पत्रांतलें जहरी वाक्य आठवलें. ' केलंच पाहिजे येवढं अरविंदाच्या सुखासाठीं. आपली आवड वेगळी आणि या तरुणांची आवड वेगळी. आपण कशाला उगीच ढवळाढवळ करा ! '

बसल्यावर सुलूनें पुन्हां हंसतमुखानें प्रश्न केला, " काय बरं काम आहे आपलं ? "

" अं—माझं काम होय ? मी—मी अरविंदाचा चुलता." दामोदरपंतांना काय बोलावें हें न सुचून ते अडखळत बोलले. सुलूचें तोंड खरकन् उतरलें. त्यावरील आनंद कुठच्या कुठें पळाला. डोळ्यांवर आसवांचें एक विरल पटल आलें. इतका वेळ हृदयांत लपून बसलेलें स्वभावाचें गांभीर्य व सुलूला वाटत असलेलें दुःख त्या अश्रुपटलावर स्पष्टपणें प्रतिबिंबित झालेलें पाहून काकांच्या प्रथमदर्शनीं झालेल्या कल्पना पार विरघळल्या.

सुलूनें लगेंच मन आवरलें. जरा कठोर स्वरानें ती म्हणाली, "तुमचें एक पत्र चुकून माझ्याकडे आज आलें, तें मी परत अरविंदांच्याकडे पाठविणार होतें; बरं झालं तुम्हींच आलां." सुलूनें उठून टेबलावरील पत्र घेतलें व दामोदरपंतांच्यापुढें धरलें.

हंसून दामोदरपंतांनीं पत्र घेतलें व त्यावर एकवार नजर फिरवून तें खिशांत घातलें. नंतर त्यांनीं खिशांतून सुलूचें पत्र काढून तिच्या समोर धरलें. "हें तुमचें पत्र चुकून मला मिळालें."

सुलूनें थरथरणाऱ्या हातानें पत्र घेतलें, तें वाचण्यासाठीं तिचें मन अधीर झालें होतें.

पण धडी करून तिनें तें ब्लाउजच्या खिशांत ठेवलें. सुलूचे सर्व मनोविकार व मुस्काराहि काकांच्या तीक्ष्ण दृष्टींतून सुटला नाहीं. काकांच्या मुद्रेवर अधिकाधिक समाधान झळकत होतें.

हंसून दामोदरपंत म्हणाले, "तें पत्र वाचायची कांहीं जरूर नाहीं आतां."

सुलूच्या कपाळावर आंठ्या पडल्या. जरा तीक्ष्णपणानें ती म्हणाली, "पत्राचें काम आपणच करायला आलांत कीं काय?"

सुलूची निराशा आणि आपल्यावरील तिचा रोष बघून काकांना अधिकच बरें वाटलें. ते हंसून म्हणाले, "छे, छे! पत्रानें झालें नसतें तें काम करायला मी आलों आहें."

आश्चर्यानें भ्रुकुटी उंचावून सुलूनें विचारलें, "म्हणजे काय?"

काका मोठ्यानें हंसले. "म्हणजे काय! अरविंदानें लग्न मोडण्यासाठीं पत्र लिहिलें होतें. मी तुमचें लग्न जुळवण्यासाटीं आलों आहें."

" म्हणजे ? काय म्हणतां तुम्ही, काका ? खरंच का हें ? " अरविंद खोलींत घाईघाईनें शिरत अत्यानंदानें म्हणाला.

अरविंद आणि सुलू यांचा आनंद बघून काकांना आनंदाचें भरतें आलें.

" मूर्ख पोरगा ! मी मध्यें पडलों नसतों तर, पत्रानिशीं लग्न मोडीत होतास कीं रे ! निराशेच्या भरांत हिचं पत्र मलान् माझं पत्र हिला अशी गडबड करून टाकलीस. "

" म्हणूनच तर मी घाईघाईनें तुमच्याकडे गेलों. म्हटलें पत्रें वेळींच ज्याचीं त्याला देऊन चूक सुधारावी. तों मला कळलें तुम्ही सुलूच्यासंबंधीं आपल्या रामाजवळ चौकशी करीत होतां म्हणून. तेव्हां मला वाटलें, झाला घोटाळा, आणि घाबरूनच आलों मी इकडे. "

" बाळा, पत्रांच्या घोंटाळ्यामुळें तुझ्या लग्नाचा घोंटाळा वांचला बरं. दैव कधीं कधीं मधें पडतं, तें हें असं बरं ! आतां हिच्या वडिलांचा पत्ता सांग बघूं मला, म्हणजे पत्र लिहितों मी त्यांना. लग्न मुहूर्त सर्व ठरवून टाकतों. कां रजिस्टर्ड करायचं ? "

अरविंद आणि सुलू दोघें हंसूं लागलीं. अरविंद म्हणाला, "बा काका, अशी घाई कशी चालेल ? आमच्या परीक्षा जवळ आल्या आहेत, तेव्हां मध्येंच लग्नाची गडबड नाहीं उपयोगी. पास झाल्या-वर लग्न करायचें."

" असं, असं, आलं लक्षांत. " काका उठत म्हणाले. पण त्यांच्या मुद्रेवर 'या अलीकडच्या पोरांचं वागणंच वेगळं, आम्हांला कांहीं त्यांत समजत नाहीं ' असा भावार्थ स्पष्ट उमटला होता.

" बरं, जातों मी. " असें म्हणून ते सुलूनें विचारलेल्या चहाच्या विनंतीला नकार देऊन निघून गेले.

*  *  *

" मला हवाय् अं चहा. बरं पण काकांनीं दिलेलं पत्र कुठं आहे ? "

" माझ्या खिशांत, " सुलूनें मिस्किलपणानें उत्तर दिलें, " वाचायचं आहे मला तें. "

" मुळींच नाहीं वाचायचं. आण बघूं तें इकडे. " अरविंदानें हात पुढें केला.

" नाहीं देत, काय शिव्या दिल्या आहेत बघूं दे तरी मला. लिहितांना लिहिलंत आणि आतां कां भितां ? "

" अग शिव्या असत्या तर नसतों भ्यायलों. निराशेच्या भरांत तुझी भरमसाट स्तुति करून बसलों. आतां लग्न व्हायचं तेव्हां ती स्तुति तूं वाचून उपयोगी नाहीं. नाहींतर तूं डोक्यावर मिरीं वांटायला लागशील. "

" अय्या, आणि असलं कां पत्र काकांना पाठवलंत ! वाचलेलं दिसतंय त्यांनीं तें. "

अरविंद अतिशय लाजला. " अग चुकून झालं तें."

" त्या चुकीचं प्रायश्चित्त म्हणूनच मी तें पत्र मोठ्यानें वाचणार अन् तुम्हीं ऐकलं पाहिजे तें. " सुलू पत्र काढीत म्हणाली.

---

# प्रतिष्ठेचें मोजमाप

"इश्श, हें रे काय, दादा ? काय कपडे हे तुझे !"

"मग त्याला काय झालं ?"

हेमंत बाहेर जाण्याकरितां निघाला होता. इतक्यांत त्याची बहीण विमलाताई आली. बहीणभावंडांची व्हरांड्यांतच गांठ पडली. बहिणीच्या उद्‌गारांकडे दुर्लक्ष करून हेमंत पुढें म्हणाला, "काय, आज पाठवलं वाटतं पतिपंतांनीं ?"

विमलाताईनें केवढीतरी मान वेळावली, "सरळ नांव घ्यायचं सोडून हें काय हें ?"

"नांव घ्यायचं ? मी कशाला बुवा त्यांचं नांव घेऊं ? तुला वाटलं तर तूं घे नांव पाहिजे तर. आंतून आईला बोलावतों नांव ऐकायला. आई, ए आई !" हेमंतानें हांक मारली.

हेमंतानें शब्दांत पकडलेलें पाहून विमलाताई लाजली होती.

तितक्यांत हेमंताची हांक ऐकून जानकीबाई आंतल्या खोलींतून बाहेरल्या व्हरांड्यांत आल्या. विमलाताईला पाहून त्यांना समाधान वाटलें. "तूं कां आली आहेस? गांवांतल्या गांवांत दिली, पण बोलावल्याशिवाय कांहीं येत नाहींस."

बिमलाताई हंसली. "आज कशाला बोलावलंस, आई? कांहीं काम आहे, कीं सहज?"

जानकीबाई जरा घुटमळल्या. "बरेच दिवस आली नाहींस म्हणून; अन् थोडंसं कामहि होतं." हें वाक्य बोलतांना जानकी-बाईंनीं हेमंताकडे विशिष्ट रीतीनें बघून विमलाताईला खूण केली.

ती खूण बघून विमलाताई हळूहळू हंसूं लागली. हेमंताकडे बघून ती म्हणाली, "असं आहे होय? पण दादा, मुलगी बघायला जातांना तरी निदान चांगले कपडे घाल हो. नाहींतर लंडन टी. डी. आहेस असं कुणाला वाटणारसुद्धां नाहीं."

हेमंताला जरा झणझणलें. "मग पट्टेवाल्यासारखा बिल्ला लावीत जाऊं कीं काय टी. डी. अक्षरांचा?"

विमलाताई त्याचीच बहीण होती; प्रेमळपणानें हंसून मृदु स्वरांत ती म्हणाली, "तितकं कांहीं नको करायला; पण आज बरोबर डिप्लोमा असूं दे."

"डॅम इट्!" हेमंत ओंठांतल्या ओंठांत म्हणाला व पायऱ्या उतरूं लागला. तें पाहून जानकीबाईंनीं त्याला बजावलें, "बरोबर साडेपांचला जायचं ठरलं आहे. वेळेवर घरीं ये हो."

"ओ डॅम! काय त्रास आहे बुवा!" हेमंत कुरकुरला.

"शिव्या देऊन कांहीं लग्न होत नाहीं." विमलाताई बोलली. "त्याला वेळेवर नीट कपडे करून मुलगी बघायला जावं लागतं."

पण हेमंत जास्त कांहीं न बोलतां सरळ बंगल्याबाहेर पडला. आणि गॅरेजमधून आपली बेबी मॉरिस काढून तो आपल्या एका मित्राकडे गेला. त्या मित्राचें घर आर्यन टॉकीजजवळ असल्यामुळें स्टँडजवळ गाडी उभी करणें भाग होतें. कारण रस्ता फार रह-दारीचा असल्यामुळें दाराजवळ गाडी उभी करतां येत नसे. स्टँड-जवळून हेमंत पायानेंच आपल्या मित्राकडे गेला. पण हेमंताची निराशा झाली ! कारण तो मित्र बाहेर गेला होता. हेमंत पुन्हां गाडीजवळ आला आणि दरवाजा उघडून आंत बसला. 'आतां कुठं जावं ?' या विचारांत तो क्षणभर पडला.

पण त्या थोड्याशा अवधींतच एक मोठी विलक्षण गोष्ट घडून आली. पाठीमागलें दार उघडून एक युवती गाडींत बसली व दार लावून घेऊन हुकमी आवाजांत म्हणाली, " बोटॅनिकल गार्डनमें चलो. "

या प्रकारामुळें हेमंत इतका स्तिमित होऊन गेला कीं, त्याला एक शब्दहि बोलण्याचें सुचेना.

तितक्यांत त्या मुलीनें पुन्हा आज्ञा केली, " जलदी करो. "

पुढील आरशांत त्याला त्या मुलीचें सुंदर मुखकमल दिसत होतें. पोपटी छापील पातळ व तसल्याच ब्लाउजनें तिचा गौरवर्ण अधिकच खुलून दिसत होता. त्या मुलीच्या मुद्रेवरील अधीरता पाहून आणखी कांहींएक विचार न करतां हेमंतानें सेल्फ स्टार्टरनें गाडी सुरू केली.

हेमंताचे विचारहि सुरू झाले. 'ती मुलगी आपल्याला साधा-सुधा टॅक्सीड्रायव्हर समजली असावी हें उघड होतें. कां बरें ? गाडी स्टँडवर उभी होती हें एक; आणि...आणखी काय बरें ? आणि

आपला साधा पोषाख! ' सैल पायजमा, देशी गिरणीचा कोट, अन् काळी टोपी घातली कीं हेमंताला कसा आराम वाटे! पण त्यांतल्या त्यांत त्याचा आजचा पोषाख जरासा गबाळाच होता. कोटाचें तांबूस गुलाबी रंगाचें कापड विटल्यासारखें दिसत होतें; आणि शर्ट बदलण्याचा दिवस उलटून दोन दिवस होऊन गेले होते. आळसा-खेरीज याला दुसरें कांहींच कारण नव्हतें. टोपीला नुसता ब्रश करायलासुद्धां तो कंटाळत असे.

विमलाताई नेहमींच त्याला याबद्दल बोले, आणि आजहि ती बोलली होतीच. तिकडे हेमंतानें दुर्लक्ष केलें असलें, तरी आतां तो खजील झाला. 'आतां काय करावें,' या विचारांत तो असतांच मोटार लकडी पुलाशीं आली. या ठिकाणीं अचानक एक सायकल-वाला गाडीपुढें आला. गाडीला जोरानें ब्रेक लावणें जरूर पडलें आणि गाडी धक्क्यासरशी थांबली. सायकलवाला यत्किंचित्‌हि न ओशाळतां दांत विचकून हंसत निघून गेला.

हेमंतानें चिडून ' ब्लास्टेड फूल ' म्हणून शिवी दिली. तो सेल्फ-स्टार्टर दाबणार, तितक्यांत मागून मृदु आवाज आला, " दॅट्स् राइट ! "

हेमंतानें चमकून वर पाहिलें. आरशांत एक मधुर स्मित त्याला दिसलें. तो ओशाळून म्हणाला, " सॉरी हं, माफ करा. मी तुम्हांला विसरलोंच. "

" नेव्हर माइंड ! (त्याला काय हरकत आहे?)" असें म्हणत त्या मुलीनें जणूं दार उघडण्याकरितां हात हँडल्शीं नेला. पण हेमंतानें घाईनें गाडी सुरू केली. ती मुलगी सलज्ज हंसत होती. तिचें तोंड गोरेंमोरें झालें असून बसल्या बसल्या ती सारखी कांहींतरी

हालचाल करीत होती. तिला गाडींत स्वस्थ बसवत नव्हतें. हेमंतानें पोलिसचौकी ओलांडतांच जोरांत गाडी चालविण्यास आरंभ केला. पांच मिनिटांत गाडी बागेच्या फाटकांतून आंत शिरली. हेमंतानें गाडीचा वेग कमी करून किंचित् मागें वळून विचारलें,

" किधर जानेका है ?"

त्या मुलीनें शुद्ध मराठींत उत्तर दिलें, " इकडच्या आंबराईत जायचं ठरलं होतं आमचं. इकडून गाडी घेतलीत तर बरं होईल."

त्या मुलीनें दाखविलेल्या वाटेनें हेमंतानें गाडी वळविली. दुतर्फा झाडी असलेल्या रस्त्यानें पुढें गेल्यावर उंच टाकी आहे. तेथें ओळीनें द्राक्षांचें वेल आहेत. द्राक्षांचा मळा सोडून जरा पुढें गेल्यावर ती मुलगी म्हणाली, " थांबवा इथंच. "

हेमंतानें गाडी थांबवली. दार उघडून तो बाहेर आला. त्यानें मागलें दार उघडून धरलें.

ती मुलगी हंसत हंसत खालीं उतरली आणि चालूं लागली. हेमंत गाडीशींच उभा राहिलेला पाहून ती त्याला म्हणाली, "तुम्ही चला ना. "

हेमंत गोंधळून म्हणाला, " मी कशाला ? मी बसतों इथंच. "

" वाः वाः, आधींच मीं तुमचा केवढा मोठा अपराध केला आहे. आतां आणखी तुम्हांला ड्रायव्हरसारखं इथं गाडीशीं बसवूं कीं काय ? "

चालतां चालतां हेमंतानें विचारलें, " पण मी ड्रायव्हर नाहीं हें कशावरून ओळखलं तुम्हीं ? "

खट्याळपणानें हंसत त्या मुलीनें उत्तर दिलें, " तुमच्या 'ब्लास्टेड फूल ' वरून."

जरा ओशाळून हेमंतानें विचारलें, " म्हणजे ? "

ती मुलगी मिस्किलपणानें म्हणाली, " साधे टॅक्सी-ड्रायव्हर इतक्या उच्च दर्जाची शिवी देत नाहींत कधीं. नंतर तुम्हीं लगेच ' सॉरी ' असं म्हणालांत. मग सगळीच चूक माझ्या लक्षांत आली. खरोखर, मेल्यापेक्षां मेल्यासारखं झालं मला. तावडतोब उतरून क्षमा मागणार होतें मी तुमची; पण तुम्हीं गाडी चालू केलीत. कशी तुमची क्षमा मागूं हेंच समजत नाहीं मला ! "

" प्रयत्नच करूं नका तसला." हेमंत हंसत म्हणाला.

ती मुलगी हंसली. आंब्याच्या मोठ्या वृक्षाजवळ येतांच निराशेनें ती मुलगी उद्‌गारली,

" अगबाई ! या पोरींनीं चांगलंच फसवलं कीं मला ! इथं तर कुणीच नाहीं. खरंच, येतांना गाडीसुद्धां कुठं दिसली नाहीं. अन् मी केवढी धडपड करून आलें ! "

" कदाचित् अजून येतीलहि." हेमंतानें तिची निराशा दूर करण्याचा प्रयत्न केला.

त्या मुलीला जरा आशा उत्पन्न झाली. " हो खरंच, त्यांना निघायला उशीर झाला असला, तर अजून त्या येण्याचा संभव आहे. इथंच वाट पाहूं या आपण." पण लगेच विरमून चिंतेच्या स्वरांत ती म्हणाली, " पण मी काय तुमचा वेळ घेतें आहें."

" मुळींच तसं कांहीं वाटून घेऊं नका तुम्ही. मला तरी काय उद्योग आहे ? पंधरा मिनिटें आपण वाट पाहूं. नाहीं कुणी आल्या तर जाऊं परत."

हेमंतानें खिशांतून रुमाल काढून तो खालीं पसरला.

" बसा." हेमंतानें सांगितलें. ती मुलगी बसल्यावर हेमंतहि जरा अंतराबर बसला.

ती मुलगी इकडे तिकडे बघूं लागली, आणि तिच्या तोंडून आनंदोद्गार बाहेर पडला, " अहाहा, काय सुंदर ठिकाण आहे ! "

आंब्याच्या प्रचंड वृक्षाखालीं साफसूफ केलेली ऐसपैस जागा असून तेथें बनभोजनाला येणाऱ्यांनीं कामचलाऊ मांडलेल्या चुलीहि दिसत होत्या. एका बाजूला मोठी सुंदर आंबराई तर इतर बाजूंनीं हरतऱ्हेचे वृक्ष, वेलींची दाट जाळी व झाडेंझुडुपें वगैरे शोभा दिसून येत होती. रान तर नव्हे, चांगली राखीव बाग, पण शोभा मात्र निसर्गरम्य !

मावळत्या सूर्यकिरणांनीं सोनेरी रंगवलेल्या आम्रवृक्षांच्या शाखापल्लवांनीं वर मांडव केलेला, तर आजूबाजूला हिरव्याचार वृक्षराजींनीं भिंती बनवलेल्या.

सर्व शोभा बघतां बघतां दोघांनाहि आल्हाद वाटला. कितीतरी वेळानें दोघांना एकमेकांची आठवण झाली. नंतर नजरानजर होतांच दोघांनाहि हसूं आलें.

" फार छान जागा आहे नाहीं ? "

"हूं." त्या मुलीला लगेच आठवण झाली. "बहुतेक त्या कांहीं आतां येत नाहींत. हो खरंच कीं ! मीं तुम्हांला कांहींच सांगितलं नाहीं. आज किनई आम्ही चारपांच मैत्रिणी इथं फिरायला येणार होतों. चार वाजतांची वेळ ठरली होती. एका मैत्रिणीच्या मोटारींतून आम्ही सगळ्या येणार होतों. कारण आमची मोटार पांच वाजेपर्यंत कांहीं आम्हांला मिळणार नव्हती. तात्यासाहेब—म्हणजे माझे वडील—पांच वाजतां कोर्टातून घरीं येतात; पण आज—" ती मुलगी जरा घुट-

मळली. " आज घरीं कांहीं काम निघालं, तेव्हां तात्यासाहेब मला कांहीं येऊं देईनात. माझी इतकी भयंकर निराशा झाली ! माझ्या मैत्रिणींच्याकडे सकाळींच ' मी येत नाहीं ' म्हणून निरोप पाठवला. साडेचारपर्यंत कशीबशी तग धरून बसलें. मग मात्र इथले सगळे देखावे, आणि माझ्या मैत्रिणी इथं येऊन गप्पागोष्टी करीत अस-तील, हें सगळं मनांत येऊं लागलं. चैनच पडेना ! मग मुकाट्यानं पडलें घराबाहेर. मला वाटलं, तुमची भाड्याची टॅक्सी आहे. डोकं कुठं होतं माझं ठिकाणावर ! " ती मुलगी मोठ्यानें हंसली.

हेमंतहि हंसला. " तुमचा निरोप गेल्यावर, त्या सगळ्या-जणींनीं इकडे येण्याचा आजचा बेत रहित केला असावा. "

" तसंच असेल. " ती मुलगी मान हलवून म्हणाली. " पण मला कळवायचं तरी; म्हणजे मीपण नसतें आलें. आतां तात्या-साहेब खूप रागावतील माझ्यावर. ती मंडळीहि येऊन जातील. "

" कोणती मंडळी ? " हेमंतानें विचारलें.

ती मुलगी लाजून हंसली.

हेमंतानें चमकून घड्याळाकडे पाहिलें. " अर्रर्र, सहा वाजून गेले ! "

" एखादी अपॉइंटमेंट होती कीं काय तुमची ? " ती मुलगी वाईट वाटून बोलली.

तिच्याकडे बघून निष्काळजीपणानें मान उडवून हेमंत म्हणाला, " ऊंः, महत्त्वाचं काम कसलं आलंय् ? बरं झालं अपॉइंटमेंट टळली तें ! बाकी माझेहि वडील आतां माझ्यावर खूप संतापतील. आज साडेपांचला एक मुलगी बघायला जायचं होतं. " हेमंताच्या मनांत

कांहींतरी विचार येऊन मौज वाटल्याप्रमाणें तो हंसला. " तुमचं नांव प्रेमाताई करमरकर तर नव्हे ना ? "

" तेंच नांव माझं. अन् तुम्ही हेमंतराव मराठे कीं काय ? "

हेमंतानें होकारार्थी मान हालविली. त्याला खूप हंसूं लोटलें. प्रेमा पण हंसूं लागली.

" काय गमतीचा योगायोग हा ! " प्रेमा म्हणाली, " घरीं कळलं तर काय म्हणतील ? "

" दुसरं काय म्हणणार ! म्हणतील कीं मुलं फार आज्ञाधारक आहेत. अपॉइंटमेंट कांहीं चुकूं दिली नाहीं. "

" बरं बाई, चला आता जाऊं घरीं. कुठं सोडाल मला तुम्ही ? कॉलेजपाशीं सोडलंत तर टांगा करून जाईन मी घरीं. "

" घरीं सोडतों कीं मी तुम्हांला," हेमंत म्हणाला.

" नको बाई, तुमच्या मोटारींतून उतरतांना मला पाहिलं आणि तुम्ही कोण हें त्यांना कळलं म्हणजे काय वाटेल सगळ्यांना?"

" कांहीं कां वाटेना, त्याचा परिणाम इष्ट तोच होईल ना ?" हेमंत प्रेमाकडे उत्सुकतेनें बघत जरा बिचकत म्हणाला.

प्रेमानें उठून पातळ सारखें केलें. रुमाल हेमंताला दिला. नंतर मंदस्मित करून ती म्हणाली, " बरं चला, घरीं सोडा मला. "

* * *

साडेपांचपर्यंत हेमंत परत आला नाहीं, तेव्हां हेमंताच्या वडिलांना—भाऊसाहेबांना—फार काळजी वाटूं लागली. हेमंतावर ते खूप रागावले. साडेपांच वाजल्यावर जानकीबाई व विमलाताई यांना घेऊन ते तात्यासाहेब करमरकरांच्याकडे गेले. " आम्ही प्रथम मुलगी पाहतों; मग मुलाला मुलगी दाखवूं " अशी सबब त्यांनीं सांगितली.

तात्यासाहेबांना खरा प्रकार सांगावाच लागला. तें ऐकून मात्र भाऊसाहेबांनीं आपलाहि मुलगा वेळेवर घरीं न आल्याचें सांगितलें. मग काय, दोघांना एकमेकांविषयीं एकदम जिव्हाळा उत्पन्न होऊन अलीकडल्या मुलांवर त्यांनीं रसभरित ताशेरा झाडला. या गप्पागोष्टी होऊन आदरातिथ्य आटोपल्यावर भाऊसाहेब मंडळीसह तात्यासाहेबांच्या घरांतून बाहेर पडतात तों प्रेमा हेमंताच्या गाडींतून खालीं उतरत होती. हेमंतानें दार उघडून धरलें होतें.

सर्व मंडळी आश्चर्यचकित झाली. या दोघांना मात्र लाजून चूर झाल्यासारखें वाटलें. प्रेमा एक शब्दहि न बोलतां घरांत पळाली. हेमंत मात्र हंसत भाऊसाहेबांना म्हणाला, " गाडींतूनच चलतां ना घरीं ? "

पण झालेल्या प्रकाराबद्दल सर्वांनाच विलक्षण उत्सुकता वाटत असल्यामुळें तात्यासाहेबांनीं जेव्हां हेमंताला घरांत येऊन जाण्याची विनंति केली, तेव्हां कोणींहि आढेवेढे घेतले नाहींत.

* * *

लग्न जमल्यावर एके दिवशीं हेमंत बहिणीला मुद्दाम म्हणाला,

"पाहिलंस, विमलाताई ! माझ्या पोशाखाला नांवं ठेवीत होतीस पण त्यामुळंच जमलं कीं नाहीं लग्न ? "

विमलाताई म्हणाली, " कबूल आहे अगदीं, दादासाहेब ! पण आतां पुन्हां कांहीं तशी जरूरी नाहीं, तेव्हां आतां तरी निदान चांगला, आपल्या दर्जाला शोभेसा पोषाख करीत जा. वहिनी आतां मोटारींत तुझ्याशेजारीं बसणार, तेव्हां तूं टॅक्सीड्रायव्हर-सारखा दिसलेला त्यांना कद्धीं खपायचं नाहीं. "

बाजू अंगावर येतेसें पाहून हेमंत तोंडांतल्या तोंडांत ' डॅम् इट् ' म्हणून गेला. नंतर तो खजील होऊन हंसला. तो कांहीं बोलण्या-आधींच विमलाताई त्याला म्हणाली, " बाकी वहिनीला विचार हो. शिवीवरून प्रतिष्ठितपणा ओळखणारी ही मुलगी. "

हेमंत सकौतुक हंसत होता, "शी इज् ए स्वीट् लिटल् डेव्हिल्."

---

# प्राणदान

" बाई, माझ्या बाळाला जीवदान द्या हो. तुमच्यापुढें मी पदर पसरतें, तुमच्या पायां पडतें, माझ्या मुलाला वांचवा हो. "

एवढें म्हणून हें बोलणारी बाई खरोखरीच ××× इस्पितळांतील नर्स उर्मिलाबाई यांच्या पायां पडली. ही बाई पन्नास वर्षांची म्हातारी, तर उर्मिलाबाई पंचविशीच्या आंतच होत्या. ती बाई उर्मिलाबाईच्या वयाची असती तरीहि उर्मिलाबाईंना संकोच वाटलाच असता, पण ही म्हातारी असल्यामुळें तर त्यांना अतिशयच संकोच उत्पन्न झाला. बरें तर बरें, या वेळीं त्या खोलींत दुसरी नर्स वगैरे नव्हती. त्या बाईची सून मात्र कडेवर एका मुलाला घेऊन खिन्न मुद्रा करून उभी होती.

त्या बाईला उठवीत उर्मिलाबाई सहानुभूतीनें म्हणाल्या, "बाई, तुम्ही अगदीं भिऊं नका बरें. तुमचा मुलगा अगदीं खचित बरा होईल. यापेक्षांहि वाईट अवस्थेंतले रोगी बरे झालेले आहेत. "

" खरंच कां पण हें अगदीं ? " त्या बाईनें आशेनें विचारलें. " बाई, डाकतरसाहेबांनीं तिकडं सांगितलं कीं, ' उर्मिलाबाईनीं मनावर घेतलं तर रोगी खात्रीनें वांचेल. त्यांनीं तीनचार असाध्य रोगी आपल्या प्रेमळ शुश्रुषेनं याच रोगांतून बरे केले आहेत.' बाई, म्हणूनच मी तुमच्याकडे आलें आहें. मग तुम्ही वांचवाल ना माझ्या बाळाचे प्राण ? "

या बाईचा मुलगा इन्फ्ल्युएंझानें प्रथम आजारी पडला. त्यांतच त्याला न्युमोनिया झाला. त्या वेळीं त्याला इस्पितळांत आणण्यांत आलें. तेव्हां उर्मिलाबाई दुसऱ्याच भागांत होत्या. पण दोन दिवसांनीं हा रोगी फारच कठिण अवस्थेला आल्यामुळें डॉक्टरांनीं आजच उर्मिलाबाईंना रोग्याची शुश्रूषा करण्यासाठीं नेमलें.

उर्मिलाबाई नर्स या दृष्टीनें खरोखरीच उत्तम होत्या रोग्याची शुश्रूषा त्या फार सहानुभूतीनें आणि प्रेमळपणानें करीत. कित्येक रोग्यांनीं त्यांच्या शुश्रूषेनें बरें होऊन जातांना स्वयंस्फूर्तीनें त्यांना ' देवता ' ही पदवी कृतज्ञ अंतःकरणानें अर्पण केली होती. तीन-चार न्युमोनियाचे रोगी तर निवळ त्यांच्या उत्तम शुश्रूषेमुळें बरे झाले होते. म्हणूनच डॉक्टरांनीं आज हा नवीन रोगी त्यांच्या हाताखालीं दिला होता.

या रोग्याची दोनतीन दिवस सतत शुश्रूषा करणें जरूर होतें.

पण...पण...पूर्वीच्या रोग्यांच्या वेळेला ठीक होतें. पण आतां ? लक्ष्मणरावांची आज वर्षभर क्षयरोगानें बिछान्याला खिळलेली मूर्ति उर्मिलाबाईच्या डोळ्यांसमोर उभी राहिली. त्यांच्या मनांत विचार आले, ' घरीं जाऊन मला त्यांच्याकडे नको कां पाहायला ? हे सातआठ दिवस त्यांच्या अंगांत रात्रीं जरा जास्तच ताप भरला

होता. तसा आज रात्रींहि भरला तर ! आज रात्रपाळी माझ्याकडे आहे; पण...मी जर सुट्टी घेतली तर गोदूताई या रोग्याजवळ बसतील. घ्यावी सुट्टी.'

त्या बाईनें प्रश्न विचारल्यावर क्षणभरांत हे सारे विचार उर्मिलाबाईच्या मनांत आले.

उर्मिलाबाई बोलत नाहींतसें पाहून ती बाई काकुळतीनें म्हणाली, "बाई, माझा गणू म्हणजे आमची म्हातारपणची काठी आहे हो. तिकडे आतां म्हातारपणामुळं चालण्याचीसुद्धां शक्ति राहिलेली नाहीं. ही पहा गणूची बायको आणि हा दोन वर्षांचा मुलगा, आणि पुन्हां आतां हिला चार महिने झाले आहेत. आम्हां सगळ्यांचा भार गणूवर आहे. बाई, या तरण्याताठ्या पोरीकडे पहा, या बाळाकडे पहा, आणि माझ्या पोराला वांचवा हो. दया करा."

ती बाई उसासे देऊन देऊन रडूं लागली. तिची सूनहि रडूं लागली आणि त्या दोघींचें पाहून धाकटा मुलगाहि रडूं लागला. उर्मिलाबाईना हें करुण दृश्य पाहवेना. त्यांचें मन कळवळून गेलें.

त्यांच्या अंतश्चक्षूंसमोर एक हृदयद्रावक दृश्य उभें राहिलें.—आपण या म्हातारीच्या मुलाला सोडून गेल्यामुळें, त्याची दुसऱ्या नर्सकडून नीट शुश्रूषा न झाल्यामुळें काळानें त्याला ओढून नेलें असून त्याची ती वृद्ध माता धार्यीं धार्यीं रडते आहे. क्षीण झालेला वृद्ध बाप शोकदग्ध झाला आहे. गणूची ती दीन, अनाथ, ऐन तारुण्यांत विधवा झालेली, पुन्हां गरोदर असलेली पत्नी—काय खायचं त्यांनीं ! काय ल्यायचं ! छेः, छेः ! उर्मिलाबाईना तें दृश्य असह्य झालें. अनुकंपेच्या भरांतच त्या बोलून गेल्या, "बाई, तुम्ही अगदीं भिऊं नका. माझ्या हातांत आहे तेवढें मी करीन. आज, उद्यां अहोरात्र

रोग्याची शुश्रूषा करून मी आपल्याकडून प्रयत्नांची पराकाष्ठा करीन. पण बाई, माझ्या हाताला यश देणं न देणं हें मात्र त्या परमेश्वराच्याच हातीं आहे."

हे शब्द उच्चारून होतांच उर्मिलाबाई चमकल्या. पहिलें चित्र नष्ट होऊन त्या जागीं रोगजर्जर, असहाय पतीचें चित्र अधिकाधिक सुस्पष्ट होत गेलें. आपल्या हयगयीमुळें आपला प्रेमसूर्य, सौभाग्यसूर्य अस्तंगत झाला तर–तर–नाहीं, तसं होतां कामा नये. आज घ्यायचीच रजा.

येथवर उर्मिलाबाईंचे विचार अर्धक्षणांत येतात तोंच त्या वृद्धेच्या बोलण्याकडे त्यांचें लक्ष गेलें.

उर्मिलाबाईंचे आश्वासनपर उद्गार ऐकून त्या बाईचें तोंड आशेनें उज्ज्वल झालें. " बाई, डाकतर सांगत होते कीं, तुमच्या हाताला यश आहे म्हणून. आतां तुमचं आश्वासन म्हणजे मला भविष्यासारखंच वाटतं आहे. माझ्या मुलाला वांचवा म्हणजे देव तुम्हांला कांहीं कमी पडूं देणार नाहीं. बाई, मी जातें हं आतां. चल, सुनबाई, चल आतां घरीं. घर कशाचं तें! घरांत गणू नाहीं तर घर कसं शुक वाटतं. गणू म्हणजे आमचा आनंद आहे बरं." पदरानें डोळे टिपीत टिपीत म्हातारी खोलीबाहेर पडली. तिच्या मागोमाग मुलाला कडेवर घेऊन तिची सूनहि बाहेर गेली. पण जातांना तिनें उर्मिलाबाईकडे जो एक करुण दृष्टिक्षेप केला, तो पाहून त्यांचें हृदय थरारून गेलें. ही अठराबीस वर्षांची मुलगी, एका मुलाची आई आणि पुन्हां गरोदर होती. एका दृष्टिक्षेपाबरोबरच आपल्या पतीच्या प्राणांचा ठेवा जणूं तिनें उर्मिलाबाईंच्याबर सोंपवून दिला होता.

त्या दोघी सासू-सुना गेल्याबर उर्मिलाबाई त्याच ठिकाणीं अस्वस्थ मनानें उभ्या होत्या. नंतर त्यांना पांचाचे टोले ऐकूं येऊन त्या भानावर आल्या. त्यांना दीड तास घरीं जाण्याची परवानगी मिळालेली होती. पण त्या मुदतींतला अर्धा तास गणूच्या आईनें खाल्ला होता. 'चू चू. माझी अगदीं वाट पाहत असतील ना घरीं. आतां टांगा करूनच जावं.' असें ठरवून घाईघाईनें उर्मिलाबाई खालीं आल्या आणि एक टांगा करून घरीं गेल्या.

* * *

"किती ग उशीर केलास हा ?"

लहान मुलानें आईला विचारावें तशाच रुसल्या पण क्षीण आवाजांत लक्ष्मणरावांनीं उर्मिलाबाईना पाहतांच प्रश्न केला. आजारामुळें त्यांचें मन अगदीं दुबळें झालें होतें. तसाच त्यांचा देहहि क्षीण झाला होता. तोंड काळसर फिकट आणि गाल व डोळे खोल गेल्यामुळें भेसूर दिसत होते.

लक्ष्मणरावांचा रुसवा अगदीं साहजिकच होता; कारण अर्धा तासच नव्हे; पण चार वाजल्यापासूनच ते पत्नीच्या वाटेकडे डोळे लावून राहिले होते. पांचपांच मिनिटें म्हणजे त्यांना दीर्घ काळ वाटत होता. शेवटीं उशिरानें कां होईना, पण उर्मिलाबाई आल्याचें पाहतांच लक्ष्मणरावांनीं उघड प्रश्न जरी त्रासल्याप्रमाणें केला तरी मनांतून त्यांना खरोखरी फार आनंद झाला होता.

पतीचा प्रश्न ऐकतांच उर्मिलाबाई घाईघाईनें पतीच्या बिछान्या-जवळ जाऊन बसल्या आणि लक्ष्मणरावांचा क्षीण हात आपल्या हातीं घेऊन समजुतीच्या स्वरानें म्हणाल्या, "पण मी तरी काय करूं बरं ! पांच मिनिटं आधींच यायला मिळावं म्हणून मी सारखी

धडपडत असतें. पण कांहींतरी भानगडी निघतात. आज अगदीं निघालें होतें यायला. बायकांच्या व्हिजिटिंग रूममध्यें माझी डायरी राहिली होती ती घेण्याकरितां म्हणून गेलें तर एका रोग्याच्या आईनं मला येऊन हटकलं. अर्धा तास खाल्ला पट्टा तिनं माझा." उर्मिलाबाई त्या रोग्याच्या आईबद्दल बोलून गेल्या; पण लगेच त्यांना तिचे दीन वाणीनें उच्चारलेले शब्द आठवून आपल्या कठोर बोलण्याबद्दल जरा वाईट वाटलें. त्या पुढें म्हणाल्या, "बाकी ती बिचारी तरी काय करणार ? तिच्यावर प्रसंगच कठिण आला आहे. 'तुम्ही माझ्या मुलाला वांचवा' म्हणून सारखी ती गयावया करीत होती. पायां पडली काय न् रडली काय, मला तें पाहवेना आणि तिला जाहि म्हणवेना."

लक्ष्मणराव पत्नीकडे प्रेमानें पाहत म्हणाले, "नाहीं तरी माझी उर्मिला आहेच प्रेमळ. उगीच कां दोनतीन वर्षांत डॉक्टरसुद्धां एवढी वाखाणणी करूं लागले अन् विश्वासानं जबाबदारीचीं कामं देऊं लागले ?"

लक्ष्मणरावांच्या स्तुतींत सत्य होतें. उर्मिलाबाईनीं फक्त चार वर्षांतच आपला लौकिक चांगला वाढवला होता. त्यांना नर्सिंगचें सर्टिफिकेट घेतल्यालाहि चारच वर्षें झालीं होतीं आणि त्यांच्या लग्नालाहि चारच वर्षें झालीं होतीं. लग्नानंतर उर्मिलाबाईनीं काम करावें कीं न करावें याबद्दल दोघांचा मोठाच वाद पडला होता; पण लक्ष्मणरावांची खाजगी शाळेंत मास्तरकी करून होणारी प्राप्ति फक्त पन्नास रुपये असल्याकारणानें त्या वादांत उर्मिलाबाईचा विजय होऊन त्यांनीं ××× हॉस्पिटलमध्यें नोकरीसाठीं अर्ज केला आणि

तेथेंच त्या शिकलेल्या असल्यामुळें त्यांना नोकरी पण मिळाली. याप्रमाणें या पतिपत्नींना पैशाच्या दृष्टीनें समाधानाची स्थिति होती.

पण नुसती पैशाच्या दृष्टीनेंच कशाला ? लक्ष्मणराव आणि उर्मिलाबाई यांच्या लग्नानंतरच्या दोनअडीच वर्षांत त्यांना कोणत्याच बाजूनें कांहीं कमी नव्हतें. दोघांनीं तीं वर्षें अत्यंत सुखांत काढलीं. पण सारखें सुख लागलें तर तो संसार कसला ?

लक्ष्मणरावांना विषम झाला. त्यांतून ते उठले; पण म्हणून त्यांची प्रकृति अशक्त झाल्यामुळें कांहींतरी बारीकमोठें दुखणें महिन्याकांठीं त्यांच्यामागें असेच. लक्ष्मणरावांना शेवटीं क्षय झाला. नोकरी सोडून अंथरुणावर आयुष्य घालवणें त्यांच्या भोगाला आलें आणि प्रेमस्थानाची ती दुर्दशा पाहण्याचें दुर्भाग्य उर्मिलाबाईंच्यावर कोसळलें. त्यांना नोकरी करणें भागच होतें. पण त्यांतूनच शुश्रूषा काळजीनें करून त्या पतीचें आयुष्य शक्य तितकें लांबवीत होत्या.

होय, लांबवीत होत्या. आपल्या पतीच्या आयुष्याची मर्यादा अगदीं संपुष्टांत आल्याचें उर्मिलाबाईंना चांगलें माहीत होतें. लक्ष्मणरावांना मात्र त्या खूप बरें होण्याची आशा लावीत. आणि क्षयरोग्याच्या नेहमींच्या तऱ्हेप्रमाणें आपण लौकरच खास बरें होणार अशी लक्ष्मणरावांनाहि खात्री वाटत असे.

लक्ष्मणरावांची प्रशंसा ऐकून उर्मिलाबाई एरवीं खुलून जात, पण आज त्यांना विशेषसा आनंद झाला नाहीं. त्यांचें लक्ष त्या म्हातारीच्या मुलाकडे लागलें होतें. त्यांच्या अंतर्दृष्टीसमोर म्हातारीची सून बारंबार येऊन करुण दृष्टिक्षेप करीत होती.

पण बाहेरून मात्र त्या आनंद झाल्याप्रमाणें हंसल्या. "वाः वाः !

नर्स तर फार चांगली आहे. आपल्या चहाची, औषधपाण्याची व्यवस्था करायची टाकून खुशाल बसलें आहे गप्पा मारीत.''

उर्मिलाबाईच्याबरोबर लक्ष्मणरावहि हंसले. तें हंसणें कमालीचें क्षीण होतें, पण क्षणार्धपर्यंत लक्ष्मणराव आपली शरीरव्यथा व मनोव्यथाहि पार विसरून गेले. उर्मिलाबाई असल्या म्हणजे त्यांचा वेळ चांगलाच जात असे; पण त्या फारच थोडा वेळ घरीं असत. लक्ष्मणरावांचा बहुतेक वेळ तळमळण्यांतच जाई.

आतां तरी काय! उर्मिलाबाई जरा कुठें तापबीप पाहून औषध, चहा, अंथरूण, वगैरे करून जरा टेंकतात तों त्यांची जाण्याची वेळ आली होती.

उर्मिलाबाईचें मन द्विधा झालें होतें. आज लक्ष्मणरावांच्या अंगांत ताप मुळींच नव्हता. पायांवर सूज आली होती. ती सूज पाहतांच उर्मिलाबाईना ब्रह्मांड आठवलें. पण मनाची चलबिचल दिसूं नये म्हणून त्यांनीं आटोकाट प्रयत्न केला. रडण्याचे हुंदके हंसण्याचे रूपानें त्यांनीं बाहेर काढले आणि डोळ्यांत जमणारे अश्रु हंसल्यामुळें आल्याचें त्यांनीं मिष केलें.

लक्ष्मणरावांना हें मिष कळलें नाहीं. त्यांचा वेळ पत्नीच्या सहवासांत अत्यंत सुखाचा गेला.

उर्मिलाबाईची जाण्याची वेळ झाली. पण त्यांना जाववेना. 'आज शेजारच्या मोरूच्या हातीं चिठी पाठवून रजा घ्यावी' असें त्यांचें मन त्यांना सांगत होतें, पण लगेच त्या म्हातारीची सून करुण दृष्टिक्षेपानें आपलें सुखसर्वस्व आपल्या हवालीं करीत आहे असें त्यांना दिसत होतें. आपण दिलेलें आश्वासन त्यांना आठवलें.

वेळ झाली असून उर्मिलाबाई जाण्याची चळवळ करीनात

आणि बोलण्यांतहि त्यांचें लक्ष लागेना हें पाहून लक्ष्मणरावांना जरा आश्चर्यच वाटलें. ते म्हणाले, "तुझी जायची वेळ झाली कीं."

रोज उर्मिलाबाई "जातें जातें" करीत आणि लक्ष्मणराव "जाशील ग, बैस ना मिनिटभर" असें म्हणत. आज उलट झालें. उर्मिलाबाई आज दहा मिनिटें अधिक बसल्या होत्या म्हणून मनांत नसतांनाहि लक्ष्मणरावांनीं त्यांना घाई केली.

लक्ष्मणरावांचें बोलणें ऐकून उर्मिलाबाईच्या मनाची खळबळ क्षणभर थांबली. मनाचा निश्चय करून त्या लगबगीनें उठल्या आणि जाण्याची तयारी करून "बरं जातें हं, सकाळीं लौकरच येईन." असें म्हणून त्या दारापर्यंत गेल्या. पण आज कां कोण जाणें त्यांचें पाऊल उंबऱ्याबाहेर निघेना. त्या परत लक्ष्मणरावांच्या अंथरुणाशीं येऊन बसल्या.

उर्मिलाबाई जायला निघाल्याबरोबर लक्ष्मणरावांचा इतक्या वेळचा उत्साह मावळून त्यांना अतोनात थकवा येऊन ते डोळे मिटून पडले होते. पण पत्नी परत येऊन बसल्याचें जाणून त्यांनीं डोळे उघडले. त्यांना उर्मिलाबाईची मनःस्थिति समजली. त्यांनीं उर्मिलाबाईच्या हातावर आपला क्षीण हात फिरविला.

यामुळें उर्मिलाबाईचा मनावरला ताबा नाहींसा होऊन त्या एकदम हुंदके देऊं लागल्या.

लक्ष्मणरावांना कुठून बळ आलें न कळे. ते चटकन् उठून बसले. पत्नीचें मस्तक आपल्या खांद्यावर टेंकून ते तिच्या पाठीवर हात फिरवून तिची समजूत घालूं लागले. "असं काय बरं वेड्यासारखं करावं ! तूं नेहमींची इतकी समजूतदार आणि आज हें काय आरं-भलें आहेस ! शिवाय आज मला तापदेखील नाहीं. जा तर. तूं

अगदीं देखील काळजी करूं नकोस. नाहींतरी इलाज काय आहे ? माझं दुखणं कुठवर लांबेल कोण जाणे ! पण नशिबांत आहे तें धैर्यानें भोगलं पाहिजे. जा, आज एक कठिण केस डॉक्टरनीं बळेनं तुला दिली आहे ना ? ”

उर्मिलाबाईंना म्हातारीची सून दिसूं लागली. त्या चमकल्या. ‘ माझें सुख तर आतां मोजक्या दिवसांचेंच आहे. त्यासाठीं त्या पोरीचा जन्म मी नासूं का ? त्या म्हाताऱ्या आईबापांची म्हातारपणीं अन्नान्न दशा करूं का ? त्या लहानग्या मुलाच्या आणि पुढें जन्मणाऱ्या बालकाच्या आयुष्याची माती होऊं देऊं का ? छेः छेः, त्या कुटुंबाचे प्राण वांचवणं हेंच माझं कर्तव्य आहे. तेंच माझं कर्तव्य आहे.’

उर्मिलाबाईनीं मनाचा निश्चय केला. पतीचा पुन्हां एकदां निरोप घेऊन त्या घराबाहेर पडल्या. जातां जातां वाड्यांतल्या एका बाईला रोजच्याप्रमाणें एकदां भेटून, रात्रीं निजण्यापूर्वीं आणि सकाळीं एकदां आपल्या घरांत डोंकावून पतीला काय हवें नको तें विचारण्याची त्यांनीं विनंति केली. त्या बाईनें “ तुम्ही काळजी करूं नका. मी बघेन लक्ष्मणरावांच्याकडे.” असें म्हटल्यावर त्या तडक टांगा करून इस्पितळांत गेल्या.

ती सबंध रात्र उर्मिलाबाईनीं गणूच्या शुश्रुषेंत जागून काढली. सकाळीं घरीं जाऊन त्या लक्ष्मणरावांची प्रकृति पाहून आल्या. लक्ष्मणरावांना ताप मुळींच नसून पायांवरली सूज तेवढी वाढली होती. शिवाय तोंडावरहि सूज आली होती. पण आज कठोर मन करून त्या एका तासांतच परत इस्पितळांत गेल्या. दुसऱ्या नर्सनें

थोडी झोंप घेण्याचा आग्रह केला तरीहि त्या आपल्या रोग्या-जवळून हलल्या नाहींत. काळाच्या जबड्यांतून त्याला आपलें सर्वस्व वेंचून ओढून काढण्याची त्यांनीं जणूं प्रतिज्ञा केली होती. संध्याकाळीं पुन्हां फक्त तासभर घरीं जाऊन त्या आल्या. गणूची आई व बायको पुन्हां त्यांना भेटून गेल्या. बायकोनें पुन्हां एकवार दृष्टिक्षेपानेंच आपलें सौभाग्य संभाळण्याविषयीं उर्मिलाबाईची करुणा भाकली.

उर्मिलाबाईनीं दुसऱ्या रात्रींहि क्षणभर डोळ्याला डोळा लावला नाहीं. आजची रात्र म्हणजे गणूला काळरात्रच होती. आपला आज मृत्यूशीं कठिण झगडा होणार हें त्या जाणून होत्या. मृत्यूच्या प्रतिकारार्थ त्यांची अविश्रांत खटपट चालली होती. रोग्याला आराम वाटेल अशी एकहि बारीकसारीक गोष्टसुद्धां त्या करण्यास चुकत नव्हत्या किंवा कंटाळत पण नव्हत्या.

पण मधूनमधून त्यांना लक्ष्मणरावांची आठवण होत होती. लग्नानंतरच्या सुखद आयुष्याची आठवण होऊन त्यांचा जीव हुरहुरत होता.

बारावर दोन वाजतां तर त्यांना भास झाला कीं, लक्ष्मणराव आपल्याला हांका मारीत आहेत. त्या भरांत त्या दारापर्यंत आल्या. त्यांना वाटलें 'गोदूताईना या रोग्याजवळ बसवून आपण घरीं जावें. कालच आपली रात्रपाळी झाली आहे. आपल्याला घरीं जाण्याचा हक्क आहे.'

पण दार उघडण्यापूर्वी त्यांनीं मागें वळून रोग्याकडे पाहिलें. क्षणभर त्यांचा हात दारावरच राहिला. नंतर एक निःश्वास सोडून

त्या रोग्याजवळ येऊन बसल्या. पुन्हां त्यांनीं परिचर्येला सुरुवात केली. हळूहळू त्यांच्या मुखावर समाधान झळकूं लागलें.

उर्मिलाबाई विजयी झाल्या. गणूवरचें संकट टळलें. गणू बराच हुषार झाला होता. त्याची आई व बायको यांना परवानगी मिळाल्यामुळें त्या त्याला भेटून गेल्या. गणूच्या आईनें उर्मिलाबाईंचे शतशः आभार मानले. डॉक्टरांनींहि त्यांची फार वाहवा केली. आतां संकट टळलें असें जाणून दुसऱ्या एका नर्सला रोग्याजवळ बसवून त्या खोलीबाहेर पडतात तों मोरू धांवतच 'घरीं लवकर चला' म्हणून निरोप घेऊन आला. उर्मिलाबाईंच्या सर्व ध्यानांत आलें. दुःखावेगानें त्या खालींच बसल्या. दुसऱ्या एका नर्सनें हाताला धरून त्यांना टांग्यांत बसवून घरीं नेलें.

मृत्यूनें त्यांच्यावर कडी केली होती. उर्मिलाबाईंनीं त्याच्या तोंडचें सावज काढलें म्हणून चिडूनच कीं काय त्यानें उर्मिला-बाईंच्या अपरोक्ष त्यांच्या पतीचे प्राण हिरावून घेतले होते. त्या वेळीं लक्ष्मणरावांच्याजवळ कोणीहि नव्हतें. जीव घाबरला तेव्हां त्यांनीं हांक मारण्याचा प्रयत्न केला, पण शब्द उमटला नाहीं. सकाळीं शेजारची बाई येऊन पाहते तों लक्ष्मणराव बोलेनात किंवा हालचालहि करीनात. तेव्हां घाबरून तिनें त्यांच्या शरीराला हात लावून पाहिला तों तें थंड पडलें होतें.

पतीच्या शवाला मिठी मारून उर्मिलाबाई धाय मोकलून रडल्या. नंतर त्या शांत झाल्या. आपण वांचवलेल्या रोग्याची त्यांना आठ-वण झाली. त्याची पत्नी सकाळीं त्याला भेटायला आली होती, त्या वेळचें तिचें आनंदोत्फुल्ल मुख व तिच्या डोळ्यांतील कृतज्ञ

भाव त्यांना दिसूं लागला. त्याच्या आईचे कृतज्ञतेचे उद्गार त्यांना ऐकूं आले आणि तिचे आनंदाश्रु त्यांच्या डोळ्यांसमोर उभे राहिले.

उर्मिलाबाईच्या मुखावर समाधानाचें हास्य चमकलें. " माझ्या सुखाची होळी झाली, पण गणूच्या कुटुंबांत तरी आनंदाची वृष्टि झाली ना ! "

———

# बनवलेली बाहुली

केवढ्या तरी उत्साहानें माझी तयारी मी करीत होतें. नुकतेंच घेतलेलें निळ्या व गुलाबी चौकटींचें इंदुरी लुगडें, रेशमी अस्मानी ब्लाउज व गळ्यांत कल्चर मोत्यांची दुपदरी कंठी घालून मीं एकवार आरशांत पाहिलें. सर्व तयारी यथायोग्य झाल्याचा निःश्वास सोडीत मीं केंसांवरून हलका हात फिरवला अन् टेबला-वरच्या घड्याळांत पाहिलें तों पावणेचार झाले होते. "अय्या! झालीच कीं निघायची वेळ!" असें मनाशींच उद्गारून मी घाई-घाईनेंच शरच्चंद्रांची तयारी झाली कीं नाहीं हें बघण्यासाठीं दिवाणखान्यापलीकडील शरच्चंद्रांच्या खोलींत गेलें. पण त्यांचा तिथें पत्ता नव्हता!

गाडी आणण्यासाठीं तबेल्याकडे ते गेले असावेत असा विचार करून दिवाणखान्यापुढील सज्जावर कठड्याला टेंकून मी वाट पाहत

उभी राहिलें. खालून कमानीवर चढलेला कृष्णकमळीचा बेल बरील सज्जाच्या कठड्यावरून पसरला होता; त्याचें एक फूल तोडून मीं डोकींत खोवून दिलें.

केव्हां एकदां हे गाडी आणतात अन् केव्हां आम्ही निघतों असें मला झालें होतें.

कारण आज विमलाकांतांनीं आम्हांला आपल्या घरीं चार बाजतां चहाला बोलावलें होतें. विमलाकांतांच्या पत्नी विमलाबाई यांच्याशीं ओळख व्हावी अशी फार दिवसांपासून माझी इच्छा होती. तो सुयोग आज आलेला होता आणि म्हणूनच तर मी इतकी आनंदांत होतें.

माझे पति शरच्चंद्र आणि विमलाकांत यांची कित्येक वर्षांची ओळख. आमच्या लग्नानंतर अर्थातच माझीहि विमलाकांतांशीं ओळख झाली. ते नेहमीं आमच्या घरीं येत आणि आमच्या खूप गप्पागोष्टी चालत. विमलाकांतांचा स्वभाव मोठा उमदा होता. वृत्ति आनंदी आणि खेळकर असल्यामुळें ते आले कीं तीनचार तास मजेंत जायचेच. टेनिस वगैरे खेळांत ते तरबेज होते, त्यांच-प्रमाणें पेटीवादनांतहि बरेच कुशल होते.

ज्याप्रमाणें माझ्या गायनाला विमलाकांतांच्या पेटीची नेहमीं मदत होई, त्याचप्रमाणें माझ्या विणकामाविषयींहि मोठ्या रसिक वृत्तीनें गुणदोष दाखवून ते मदत करीत. माझ्या अंगच्या गुणांची ते दिलदारपणानें प्रशंसा करीत; पण त्याबरोबरच आपल्या पत्नीचीहि स्तुति करण्याची संधि ते वायां घालवीत नसत. विमला-कांतांच्या बोलण्यावरून त्यांच्या पत्नी विमलाबाई या दिसण्यांत सुंदर, अनेक कलांमध्यें प्रवीण, शिवाय उत्तम गृहिणी व उत्तम

माता असाव्या असा माझा दृढ समज झालेला होता. विमलाकांतां-सारख्या देखण्या व कलावंत मनुष्याला इतकी अनुरूप पत्नी मिळाल्याबद्दल मला खरोखर मनापासून आनंद वाटत असे आणि विमलाताईची ओळख व्हावी असें मला फार वाटे.

विमलाकांत मला नेहमीं आपल्या घरीं येण्याबद्दल आग्रह करीत आणि मीहि पत्नीला घेऊन येण्याबद्दल त्यांना सांगत असें. पण कित्येक महिने लोटले तरी मीहि त्यांच्या घरीं गेलें नव्हतें आणि विमलाबाईहि आमच्या घरीं आल्या नव्हत्या. मीं शरच्चंद्रांना ' चला ' म्हटलें कीं ते नुसते ' जाऊं जाऊं 'वरच भागवीत.

मी अधीर मनःस्थितींत सज्जावर उभी होतें; पण दहा मिनिटें झालीं तरी गाडीचाहि पत्ता नाहीं आणि शरच्चंद्रांचाहि पत्ता नाहीं, हें बघून मला रागाची लहर आली. सव्वातीन वाजतां मी शरच्चंद्रांना झोंपेंतून उठवून तयारी करण्याबद्दल सांगितलें होतें. पुन्हां झोंपले कीं काय हे !

हा विचार मनांत येतांच मी शयनगृहांत गेलें. खरोखरीच शरच्चंद्र खुशाल पलंगावर पांघरूण घेऊन पडले होते ! झोंपेंत नव्हे, डोळे चांगले उघडे होते त्यांचे आणि मला पाहतांच मधुर स्मिताचा प्रयोग करून ते म्हणाले, " ओऽऽ हो ! आतां स्वप्नांत एक देवता पाहिली मीं. इतकी सुंदर होती की स्वप्न संपून उठवेनाच ! पण खरोखर त्या देवतेपेक्षांहि तूं सुंदर दिसते आहेस. "

" इश्श, हें काय हें असलं वागणं ! चार वाजून पांच मिनिटं झालीं. आपण त्यांच्या घरीं एव्हांना पोंचायला हवं होतं अन् मीं जागं केल्यावर खुशाल पुन्हां निजलांत ? "

" मग काय करूं ? अग, ती विमलाबाई अजून घोरत पडली असेल. तिला जागी करायला विमलाकांताला अर्धा तास लागेल. नंतर ती आपल्या स्वागताची तयारी करील, समजलीस. " असें म्हणून शरच्चंद्रांनीं खुशाल तोंडावरून पांघरूण घेतलें.

मीं रागाच्या सपाट्यांत खसकन् शरच्चंद्रांचें पांघरूण ओढलें. " आधीं उठून तयारी करा बघूं. तुम्ही नेहमीं त्यांच्याकडे जातां. तुम्हांला वेळेचं महत्त्व नसेल; पण मी आज पहिल्यानंच त्यांच्याकडे जातें आहें. उगीच उशीर करून विमलाबाईचं माझ्याबद्दल वाईट मत व्हावं असं मला नाहीं वाटत. "

" अस्सं होय ! " शरच्चंद्र मोठमोठ्यानें हंसत सुटले. "विमलाबाईच्यावर चांगलं इंप्रेशन मारायचा बेत आहे होय तुझा ! बरं बरं, चला तर, जाऊंयाच आज विमलाकांताकडे. " शरच्चंद्रांनीं चूळ भरून पांच मिनिटांत कोटटोपी घातली.

आम्ही एकदांचे निघालों. गाडी चालवतांना शरच्चंद्र मला म्हणाले, " परत येतांना इंप्रेशनचं ओझं बरोबर आहे नव्हे का ? गाडीच्या मागल्या पोकांत खूप जागा आहे. "

पण मीं शरच्चंद्रांच्याकडे बघितलेंसुद्धां नाहीं. त्यांच्या अवेळीं विनोदाची मला चीड आली होती. पण त्यांना जणूं माझ्या रागावण्याची मजा वाटत होती.

" जा गडे, नको बोलूंस ! " असें म्हणून शरच्चंद्रांनीं मान वेळून असा कांहीं जनानी अभिनय केला कीं मीं आलेलें हंसूं लपविण्यासाठीं डाव्या बाजूच्या खिडकीकडे तोंड वळवलें.

आम्ही साडेचार वाजतां विमलाकांतांच्या घरीं पोंचलों. गाडीचें

हॉर्न ऐकतांच विमलाकांत घरांतून बाहेर गाडीजवळ आले. माझ्या-करितां गाडीचें दार उघडून हंसतमुखानें विमलाकांतांनीं आमचें स्वागत केलें.

" किती दिवसांनीं आलांत तुम्ही ? उशीर झाला, म्हटलं आजहि तुमचं येणं जमत नाहीं कीं काय ? विमल चार वेळां म्हणालीसुद्धां कीं, ' आज कांहीं सरलाबाई येत नाहींत. ' "

मीं ओशाळून म्हटलें, " आम्ही निघणार, इतक्यांत यांच्याकडे एकजण आले. तेव्हां यांना बसावं लागलं. म्हणून जरा उशीर झाला. "

मीं शरच्चंद्रांच्याकडे रुष्टपणें पाहिलें, पण ते साळसूदपणें हंसून म्हणाले, " ए, असं खोटं काय बोलतेस ? खुशाल झोंपली होती रे साडेतीनपर्यंत. त्याच्यापुढं नट्टापट्टा. मीं घाई केली म्हणून आतां तरी आलों ! "

शरच्चंद्र सरळ माडीवर गेले.

विमलाकांतांनीं मला स्वैपाकघरांत नेलें. स्वैपाकघराच्या मध्य-भागीं दहा वर्षांच्या आंतील तीन मुलांच्या घोळक्यांत जमिनीवर फतकल घालून एक स्थूल अंगाची स्त्री बसली होती. मांसाचे आणि चरबीचे गोळे जणूं अंगावर थापले होते. काळासांवळा बेघाट तोंडावळा, नकट्या नाकाच्या बोंडीवर आणि ओंठांवर दिसणारे घामाचे थेंब, घामामुळें फरपटलेलें कुंकू, मानेवरील घामाचीं पुटें आणि नेसलेलें मळकट लुगडें— अशा वर्णनाची ती स्त्री होती. तिन्ही मुलें गोरींगोमटीं होतीं, पण मळलेलें शरीर आणि कपडे यांमुळें तीं विशोभित दिसत होतीं. त्या मुलांचें दुपारचें खाणें चालू होतें.

आम्हांला बघतांच ती स्त्री हंसून पुढें आली व मार्झे "या आंत" म्हणून तिनें स्वागत केलें. विमलाकांत हंसून म्हणाले, "फार मनांत होतं ना सरलाबाईंची ओळख व्हावी असं! आतां बोला मोकळेपणानं." विमलाकांतांनीं लगेच एक पाट माझ्याकरितां मांडून दिला आणि ते माडीवर गेले.

'याच कां बिमलाबाई!' माझ्या मनाला आश्चर्याचा एक धक्काच बसला! औपचारिकपणें हंसून मी पाटावर बसलें.

विमलाबाईंचीं मुलें 'आई–आई' करून गोंगाट करूं लागल्या-मुळें त्या पुन्हां आपल्या जागीं बसून मुलांना भरवूं लागल्या.

स्वैपाकघरांत मीं नजर टाकली, तर तेथेंहि अव्यवस्था व अमंगळपणा यांचेंच प्रदर्शन होतें.

इकडे खाऊं घालतां घालतां विमलाबाई मुलांना रागावून धम्मक-लाडूहि चारीत होत्या. मधूनमधून माझ्याशीं तर मधूनमधून मुलांशीं असें त्यांचें बोलणें चालू होतें.

"पाह्यलंत! मुलांचा हा असा गोंधळ पडतो. बशा, नीट बस पाहूं. मन्या, किती पाणी पितोस? खाशील काय मग? कां मारलंस रे मधु त्याला तूं? बघा सरलाबाई, जीव कसा त्रासून जातो नुसता. तुम्ही बऱ्या आपल्या मोकळ्या आहांत."

मला उद्देशून उच्चारलेलें शेवटलें वाक्य ऐकून मी मनांत चकितच झालें. पण तसं कांहीं न दाखवतां हंसून त्यांच्या बोलण्याला मी होकार देत होतें. बिमलाबाई ज्या गोष्टीबद्दल मुलांना रागवत, त्याच गोष्टीबद्दल कौतुकानें हंसत आणि आईला हंसतांना पाहून मुलांनाहि स्वतःच्या अपराधाबद्दल कौतुकानें हंसूं येई.

शेवटीं मुलांचें खाणेंपिणें आटोपून त्यांना बाहेर लावून दिल्या-

वर विमलाबाई माझ्याशीं बोलूं लागल्या. परंतु बोलतां बोलतां त्यांनीं चहाच्या तयारीला सुरुवात केली. रॉकेल काढून स्टोव्ह मोठ्या प्रयासानें पेटल्यावर त्यावर एका पातेल्यांत आधण ठेवून या फळीवरून साखरेचा डबा, त्या कोनाड्यांतून अर्धा संपलेला व एका कोपऱ्यांतून सांडत असलेला चहाचा पुडा, मोरीच्या कट्ट्यावरलें गाळणें आणि चुलीपाठीमागली पहिला चहाचा चोथा शिल्लक असलेली चहादाणी अशा जिनसा आणण्यासाठीं त्यांच्या खेपा चालू होत्या.

विमलाबाई मला म्हणाल्या, "हे नेहमीं मला तुमच्याबद्दल सांगत असतात. तुम्ही खूप विणकाम करतां म्हणे!"

यावर मीं म्हटलें, "तुम्हीदेखील पुष्कळ चांगलं विणकाम केलं आहेत ना? मला पाहायचं आहे."

"फुरसतीप्रमाणं आपलं केलं आहे थोडंसं. आतां वर दाखवीन तुम्हांला. आज आलांत, फार बरं केलंत. केव्हांची मी वाट बघत होतें."

मी मनांत हंसलें. कारण वाट बघितल्याचें कोणत्याहि तयारीवरून दिसत नव्हतें! फक्त चिवडा केल्याचीं चिन्हें स्वैपाकघरांत पसरलेलीं दिसत होतीं. पण मी सत्कार झाल्याप्रमाणें उघड दर्शवून विमलाकांतांच्या सुस्वभावीपणाबद्दल दोनचार वाक्यें बोललें.

यावर विमलाबाईनीं विमलाकांतांच्या आपल्यावरील प्रेमवर्णनाला सुरुवात केली. "यांना माझ्याशिवाय आठ दिवसहि चैन पडत नाहीं. माझ्याशिवाय दुसऱ्या कुणाच्या हातचा स्वैपाक यांना चालतच नाहीं. माहेरीं गेलें तरी तारा करतात.." वर्णनाच्या भरांत विमलाबाई संततिनियमनापर्यंत बसरल्या.

माहेरीं कोणकोण आहेत याबद्दल विचारल्यावर ती माहिती देऊन विमलाबाईंनीं माहेराचें वर्णन सुरू केलें. " माझ्या माहेरची लाखाची इस्टेट आहे. सगळी माझी आहे, कारण मला भाउबिऊ कोणी नाहीं. सासरची गरिबी फार आहे. माझ्या माहेरची मदत पुष्कळ आहे या मंडळींना. मला काय हो, नुसतं माहेरीं पत्र पाठवलं कीं दोन हज्जारांची मोटार उद्यां येईल. पण या मंडळींना मोटार बाळगायची ऐपत आहे कुठं ? " एक नी दोन ! कितीतरी सांगितलें त्यांनीं.

विमलाबाईच्या माहेरच्या श्रीमंतीचें टोलेजंग वर्णन ऐकून मी तर थक्कच झालें !

चहा उकळून तयार होत आहे इतक्यांत विमलाकांत एका ट्रेमध्यें चांगल्या कपबशा घेऊन आले. ते विमलाबाईंना म्हणाले, " काय खूप मैत्री जमवलेली दिसते आहे."

ट्रे खालीं ठेवतां ठेवतां विमलाकांत मला म्हणाले, " वर येतां ना ? आपण सगळीं वरच चहा घेऊं. "

मी ' हो ' म्हणून विमलाकांतांच्याबरोबर वरल्या दिवाणखान्यांत गेलें. शरच्चंद्र तिथें बसलेलेच होते. माझ्याकडे बघून ते खवचटपणें हंसत होते. पण तिकडे लक्षच न देतां मी इकडेतिकडे दिवाणखान्यांत बघत होतें. खुंट्यांवरून विमलाबाईचीं लुगडीं, ब्लाउज आणि विमलाकांतांचे कोट, शर्ट, नेकटाय वगैरे सामान लोंबत होतें. कोनाड्यांतून सामान कसेंतरी भरून ठेवलें होतें. हें बघून मला नवलच वाटलें ! विमलाकांत बाहेर नीटनेटके दिसत. मग घरांत ते इतके कसे अव्यवस्थित वागतात !

तितक्यांत शरच्चंद्र मला म्हणाले, " अग, वरच्या त्या विणलेल्या तजबिरी बघ ना आधीं. बघ कसं विणलंय तें. नाहींतर तुझं विणकाम !"

तोंडानें प्रशंसापर उद्गार काढणें मला भागच होतें. पण कसलें विणकाम तें ! कुशलतेपेक्षां गचाळपणाचेंच प्रदर्शन होतें त्यांत.

माझ्या मनाला असें वाटतें इतक्यांत विमलाकांत मोठ्या अभिमानानें हंसून कौतुकानें म्हणाले, " घरकाम, मुलं–सगळं सांभाळून तिनं हें केलेलं आहे. "

शरच्चंद्र तितक्याच प्रशंसेचा स्वर काढून म्हणाले, " यांनीं तीं चित्रं प्रदर्शनांत पाठवलीं होतीं ना. "

मला वाटलें शरच्चंद्र चेष्टा करीत आहेत. म्हणून मीं हंसत म्हटलें, " अरे वा ! मग बक्षिस मिळालंच असणार ? "

विमलाकांत तिरस्कारव्यंजक स्वरांत सांगूं लागले, " नाहीं हो. तिथं वशिलेबाजी फार. घरीं आलेल्या प्रत्येकानं त्या चित्रांची बाखाणणी केलेली आहे; पण प्रदर्शनांत नुसतं शिफ़ारसपत्रसुद्धां देत नाहींत. "

मी विस्मयचकित होऊन विमलाकांतांकडे बघतच राहिलें. स्वतः इतके कलावंत आणि एरवीं तारतम्यभावानें रसिकता दर्शवणारे विमलाकांत या विणकामाची प्रशंसा करूं शकतात तरी कसे ? तीं चित्रें त्यांनीं प्रदर्शनांत पाठवलीं तरी कशीं ? आणि बक्षिस न मिळाल्याबद्दल ते नांवें ठेवतात तरी कसे ?–या विचारांनीं मी अगदीं आश्चर्यमूढ होऊन गेलें.

तितक्यांत विमलाबाई चहाफराळाचें घेऊन आल्या. आम्हीं फराळाला सुरुवात करणार इतक्यांत मोलकरीण धाकट्या सहा

महिन्यांच्या मुलाला घेऊन आली. तिच्याकडून विमलाबाईंनीं मुलाला घेतलें.

" हाच धाकटा वाटतं ? " असें विचारून मीं त्या मुलाला जवळ घेतलें.

मुलगा विमलाकांतांच्यासारखाच सुंदर आणि गोंडस होता. किती गोड हंसत होता !

मीं म्हटलें, " दृष्ट लागण्यासारखा आहे अगदीं ! "

विमलाबाई म्हणाल्या, " अहो, तरी आज सकाळपासून ताप आलाय्, म्हणून जरा मलूल झालाय्. "

मीं मुलाच्या पोटाला हात लावून पाहिलें तर ताप मुळींच नव्हता. मीं म्हटलें, " आतां ताप उतरलेला दिसतोय्. "

विमलाबाई शेजारींच बसलेल्या होत्या. त्यांनीं मुलाच्या अंगाला हात लावून पाहिलें.

" अजून लागतोय् कीं ताप हाताला. आहे ताप अंगांत. "

मीं पुन्हां म्हटलें, " नाहीं हो. माझ्या हातापेक्षां अंग थंड आहे त्याचं. "

मीं असें म्हटल्याबरोबर विमलाकांत आपल्या जागेवरून उठून जवळ आले आणि मुलाच्या अंगाला हात लावून म्हणाले, " नाहीं काय म्हणतां ? चांगला एकशेंएकपर्यंत ताप आहे याच्या अंगांत !"

मला जरासा रागच आला. पण मी कांहीं बोललेंच नाहीं. नंतर चहा, फराळ व थोडें औपचारिक बोलणें झाल्यावर आम्ही जाण्यासाठीं उठलों.

विमलाकांत आणि विमलाबाई दोघेंहि मोटारीपर्यंत आम्हांला पोंचवण्यासाठीं आलीं होतीं. विमलाबाई दोनतीन वेळां "पुन्हां या.

आतां बोलावण्याची वाट बघूं नका–" असें आग्रहपूर्वक बोलल्या व त्यांना प्रत्येक वेळेला विमलाकांतांनीं साथ केली. मींहि त्यांना उलट आमच्याकडे बोलावलें.

मी गाडींत चढतांना शरच्चंद्र मला हळूंच म्हणाले, " काय, उघडूं का लगेजबॉक्स ! "

मीं हंसल्यासारखें केलें, पण मला मनापासून हंसूं आलें नाहीं. घरीं येईपर्यंत आमच्यांत फारसें बोलणें झालेंच नाहीं.

घरीं कपडे बदलतांना शरच्चंद्रांनीं पुन्हां तो विषय काढलाच. " तूं विमलाताईंच्यावर खूपच्च इंप्रेशन मारलेलं दिसतंय् ! 'पुन्हां या' म्हणून खूप आग्रह चालवला होता त्यांनीं."

विमलाकांतांच्या स्वभावाचें आज मला दिसलेलें अंग पाहून माझी निराशा झालेली असल्यामुळें शरच्चंद्रांच्या थट्टेत मला सामील होतां आलें नाहीं. न हंसतां मीं बोललें, " विमलाकांतांचं आपल्या बायकोच्या बाबतींत वागणं-बोलणं चमत्कारिकच आहे नाहीं ! "

माझी विमलाबाईंच्या बाबतींत झालेली निराशा बघून शरच्चंद्रांना मोठी गंमत वाटत होती. ते म्हणाले. " अग, म्हणून तर त्याचं नांव आम्हीं ' विमलाकांत ' असं पाडलं. त्याचं खरं नांव ' विष्णु ' आहे. पण आम्ही विमलाकांत म्हणतां म्हणतां तें नांव त्याला इतकं चिकटलं आहे कीं, त्याची बायकोसुद्धां नांव घेतांना विमलाकांत म्हणत असेल. "

मी हंसूं लागलें.

शरच्चंद्र पुढें म्हणाले, " अग, ती बाहेर जाते तेव्हां फार चांगली दिसते हो. "

" पुरें बाई आतां चेष्टा."

" अग खरंच. चेष्टा नाहीं करीत. वेणीचं चक्कर, त्यावर गजरा, पायांत पंपशू, तोंडाला पावडर—आतां घामामुळें ती पावडर बिरघळून जाते ती गोष्ट निराळी ! पण ती बिचारी त्याला काय करणार ? पावडर लावणं हें तिचं काम !"

" माहेरची लाखाची इस्टेट आहे ना ! "

" त्या निव्वळ गप्पा आहेत. पण वीसपंचवीस हजारांची इस्टेट आहे तिची. अन् म्हणूनच तर विमलाकांताला बायको इतकी सुस्वरूप आणि सद्‌गुणी वाटते. सर्वे गुणाः कांचनमाश्रयन्ते । "

मला कसेंसेंच वाटलें. " म्हणजे काय ! आपलं पैशानं भावला विकत घ्यावा तसंच झालं कीं हें ! त्यांच्या बायकोनं काय हें विमलाकांतांचं स्वरूप करून ठेवलं आहे ! कसली आवड ही ! माझ्या दोषांची तुम्ही स्तुति करूं लागलांत तर मला चीड येईल. विमलाकांतांचा एरवीं किती उमदा स्वभाव आहे. निव्वळ पैशाकरितां डोळ्यांवर ढापणं ओढून प्रेमाची आंधळी कोशिंबीर खेळायची अन् लोकांत हंसं करून घ्यायचं ! शोभत नाहीं त्यांना. "

" सरल—" शरच्चंद्रांचा चेष्टेचा स्वर एकदम नाहींसा झाला. अत्यंत गंभीरपणानें ते बोलूं लागले, " सरल, विमलाबाईंच्यावर तूं इतकी रागावतेस. विमलाकांताच्या स्वभावांतील हा भाग पाहून तुला मोठी हळहळ वाटते आहे. पण आम्ही पुरुष पैशाच्या जोरावर नेहमींच तुम्हां स्त्रियांची अशी अवस्था करतों, नाहीं कां ? ' स्वपतिच्या अंगिंच्या दोषा गणिति गुण मधुर आर्ययोषा '

अशाच बहुतेक स्त्रिया वागतात कीं नाहीं ! मिस्टर विमलकांत ही व्यक्ति अपरिचितपणामुळें आपल्याला चीड आणते; पण मिसेस् अमुकअमुक यापलीकडे तुम्हां स्त्रियांना स्वतंत्र अस्तित्व असतं का!"

"खरंच कीं !" माझ्या मनांत विचार आला. "खरंच कीं ! ज्याचा पैसा असेल त्यानं आपल्या मनाप्रमाणं दुसऱ्याच्या आयुष्याशीं खेळत राहायचं, असंच नाहीं का ?"

---

# वरदा

आगगाडींत बसलें असतां मी वरदेचें पत्र पुन्हां एकदां वाचूं लागलें.

"परमप्रिय शालिनीस सप्रेम नमस्कार—

नेपोलियन बादशहा आणि त्याचे दोघे मित्र यांनीं तीस वर्षांनीं भेटण्याचा संकेत केला होता. शालिनी, आपणहि वीस वर्षांनंतर भेटण्याचा संकेत केला होता. आठवतं का ? मग जून दहाला येशील का पुण्याला ? अगदीं येच गडे. तुला भेटण्याची फार हुरहुर लागून राहिली आहे. तुला पत्र लिहायला आवंकत होतें जरा. म्हटलं हंसशील कदाचित्. सोळाव्या वर्षी आपण केलेला तो पोरकट संकेत. अलीकडल्या दहा वर्षांत आपला पत्रव्यवहारसुद्धां नाहीं. तेव्हां शंका वाटली कीं लिहूं कीं नको हें पत्र. पण, मला राहवेना. मीं मनाची समजूत घातली कीं,

हंसलीस तरी दिल्लीला हंसशील. मला पुण्याला तुझं हंसणं थोडंच दिसणार आहे! माझ्या बोलावण्याला अनमान नाहीं ना करणार!

तुझ्या भेटीकरितां उत्सुक असलेली तुझी
बालमैत्रीण,
वरदा ”

वरदेचें पत्र प्रथम वाचून मला जितका आनंद झाला होता तितकेंच आश्चर्यहि वाटलें. मला देखील त्या संकेताची अलीकडे आठवण येत होती, पण मी देखील वरदेप्रमाणेंच आवंकत होतें.

अन् म्हणूनच वरदेच्या पत्रानें मला आनंद झाला, आणि आश्चर्य वाटण्याचें कारण असें कीं, त्यांत वसुमतीचें नांव मुळींच कुठेंहि आलें नव्हतें.

वरदेनें एप्रिलमध्येंच पत्र लिहिल्यामुळें मला जूनपर्यंत रजेची व्यवस्था नीट करतां आली. दुसऱ्या स्त्री-डॉक्टरला इस्पितळांतील कामाचा चार्ज देऊन मी पहिलीलाच मोकळी झालें. नंतर थोडें मुंबईला राहून मी वरदेला पत्रोत्तरीं कळवल्याप्रमाणें दहा जूनला एक्स्प्रेसनें निघालें होतें.

किती विचित्र मनोभावनांनीं माझें मन हेलावून गेलें होतें! नुसतें हुरळून गेलें होतें. मला वाटलें, 'कस्तुरी कितीहि वर्षे झांकून ठेवली तरी डबी उघडल्यावर तिचा सुवास दरवळल्या-वांचून आणि आनंद दिल्यावांचून कांहीं राहत नाहीं. मैत्रीचंहि तसंच नव्हे का?'

आमची तिघींची मैत्री किती गाढ होती! जगाच्या व्यवहारा-नुसार मला त्या दोघींची दृष्टभेटहि लाभली नव्हती. प्रथम आठ-

दहा वर्षे जोमांत चाललेला पत्रव्यवहारहि संपुष्टांत येता येतां अलीकडील दहा वर्षांत अजिबात थांबला होता. अन् तरीसुद्धां त्या दोघींची भेट होणार म्हणून माझा आनंद माझ्या हृदयांत मावेनासा झाला होता.

पण भेटतील कां त्या दोघी ? वरदेनें वसुमतीचें नांव पत्रांत लिहिलें नव्हतें. मीं उत्तरांत तिच्याबद्दल विचारलें असूनहि वरदेनें पुन्हां पत्रोत्तरीं तिचें नांव उल्लेखिलें नव्हतें.

तरी मनाला आशा वाटत होती, 'येणारच वसुमति.' आपल्याला वरदेनं पत्र लिहिलं तसंच वसुमतीला खास लिहिलं असणार. कारण आमचा संकेत कांहीं दोघींपुरताच नव्हता. आम्हीं तिघींनीं संकेत केलेला होता.

वीस वर्षांपूर्वीच्या आठवणींनीं माझ्या डोक्यांत गर्दी करून सोडली.

आम्ही त्या वेळीं नुकत्याच मॅट्रिक परीक्षा पास झालों होतों. नुकत्याच म्हणजे अगदीं चारच दिवसांपूर्वी. पेढ्यांनीं गोड झालेल्या तोंडाची चवसुद्धां अजून गेली नव्हती. मी, वसुमति आणि वरदा अशा आम्ही तिघीजणी शिशुवर्गापासूनच्या परकरमैत्रिणी. 'आम्ही कधींच भांडलों नाहीं' असें मी सांगूं लागलें तर तो सत्यापलाप होईल. अन् भांडणाशिवाय प्रेम कुठलं ! आणि प्रेमाशिवाय भांडण तरी कुठलं ! आम्ही कांहीं शेणामेणाच्या बाहुल्या नव्हतों. खूप भांडायच्या आम्ही. अबोला नी रुसणीं-फुगणीं, मग एकमेकीं-वांचून चैन न पडल्यामुळें कांहींतरी सबबीवर पुन्हां गट्टी जमवायची. पुढें पुढें आम्ही मोठ्या झालों तेव्हां कमी भांडूं लागलों, अन् भांडण्याची सुरसुरी वादविवादावर भागवूं लागलों.

अशाच एका वादविवादाच्या पोटीं आमचा संकेत उपजला होता. आमची आतां ताटातूट होणार होती. आणि वियोगाची कल्पनासुद्धां सहन करवत नसल्यामुळें आमची दुःखविव्हल अवस्थाहि त्या संकेताला अनुकूलता देणारीच झाली होती.

मी आणि वसुमति नेहमीं वरदेला चिडवायच्या कीं, ' तूं फार आप्पलपोटी नी स्वार्थी आहेस' म्हणून. वरदा कधींहि हा आरोप कबूल करीत नसे. उलट आमच्या उखाळयापाखाळ्या काढी. एवढें मात्र ती कबूल करी कीं, वसुमति उदार मनाची आहे. पण तुलनात्मक बोललें, तर आम्हां तिघींमध्यें औदार्य व मनाचा थोरपणाया बाबतींत वसुमति श्रेष्ठ आहे असें मीं म्हटलें कीं, वरदा तुच्छतेनें मान उडवून म्हणे, " आपल्या खिशांत पैसे खुळखुळत असतां त्यांतला एखादा भिकाऱ्याच्या हातांत टाकला तर काय मोठंसं ? "

अशाच बोलाचालीवरून एकदां मी म्हणालें, " बरं जाऊं दे. आतांपर्यंतच्या आपल्या आयुष्याला कांहीं मोठंसं महत्त्व नव्हतं. याच्या पुढच्या आयुष्यांत आपला खराखुरा स्वभाव बाहेर उमटेल. कोण स्वार्थी नी कोण उदार हें आपल्याला आणखी वीसपंचवीस वर्षांनीं ठरवितां येईल. "

लगेच आपल्या नेहमींच्या भावनानुकूल वृत्तीला अनुसरून वसुमति म्हणाली, " मग तर आपण असा संकेतच करूं या ना कीं आजपासून वीस वर्षांनीं आपण कुठेंहि असलों तरी आजच्या तारखेला तिघींनीं भेटायचंच. "

" हो हो, खरंच. मी अगदीं जरूर संकेत पाळीन. " वरदा आतुरतेनें म्हणाली.

" अन् मी पण पाळीन. अन् मग आपण एकत्र जमून कोणीं कसकसा स्वार्थत्याग केला हें एकमेकींना सांगून मग स्वार्थी कोण आणि निःस्वार्थी कोण हें अजमावून पाहूं. "

तोच संकेतदिन आज मी पाळणार होतें. कोणकोणत्या स्वार्थ-त्यागाच्या गोष्टी मीं केल्या त्यांचें मी अगदीं कसोशीनें स्मरण करून ठेवीत होतें. स्वार्थत्यागप्रसंगांची मी जणूं माळ गुंफीत होतें आणि ती मी माझ्या मैत्रिणींना अर्पण करणार होतें. त्या लांबत चाललेल्या माळेवर माझी मीच खूष झालें होतें. आठवण करावी तों तींत भर पडतच होती.

मला बरदेबद्दल मुळींच भीति नव्हती. कारण ती बोलून चालून स्वार्थसाधु. स्वभाव थोडाच बदलतो ? वसुमतीबद्दल मात्र वाटलें कीं, तिचाच बहुधा पहिला नंबर येणार. पण मी डॉक्टर असल्या-मुळें मला जशी स्वार्थत्यागाची संधि मिळत गेली तशी वसुमतीला कुठून मिळणार ? आय्. सी. एस्.ची पत्नी ती.

पण येईल का वसुमति ?

बारा वाजतां पुण्याच्या स्टेशनवर गाडी थांबते तों बरदा डब्यांत चढली अन् माझे दोन्ही हात आपल्या हातीं धरून ते दाबीत साश्रुनयनांनीं माझ्याकडे बघत ती म्हणाली, " शालिनी, वीस वर्षे झालीं कीं ग आपल्याला भेटून."

कांहीं विचारायचं नाहीं असा मीं मनाशीं अगदीं निश्चय केला होता. पण मला राहवेना. टांग्यांत बसल्यावर मीं तिला विचारलें, " वसुमति येणार आहे ना ? "

" बहुतेक नाहीं." बरदेनें त्रोटक उत्तर दिलें.

तरी मीं पुन्हां विचारलें, " पत्र आॅलंय तिचं कांहीं ? "

" नाहीं आलं. मीं पण नाहीं तिला पत्र पाठवलं."

" म्हणजे, मला पाठवलंस तसं तिला नाहीं पाठवलंस ?" मीं आश्चर्यचकित होऊन प्रश्न केला.

" नाहीं पाठवलं. मला वाटलं ती येणार नाहीं म्हणून नाहीं पत्र पाठवलं."

" तूं बोलावून ती येणार नाहींसं वाटलं तुला ?" माझें आश्चर्य अधिकाधिक वाढतच होतें.

" हो."

कांहीं बोलण्याचा कंटाळा आला कीं वरदेच्या दोन्ही भुंवयांमध्यें बारीकशा दोन उभ्या रेषा उमटत. आतांहि तिच्या कपाळावर तशाच दोन रेषा मला दिसल्या.

मीं मनांत म्हटलें, 'एकूण स्वभाव बदलत नाहीं तर ! वसुमति श्रीमंत म्हणून हिला इतकं वैषम्य वाटावं ? ही स्वतः ओल्ड मेड राहिली आहे, त्याबद्दल हिला विषाद वाटतो. मी हिच्यासारखीच अविवाहित, हिच्या इतकाच पगार मलाहि, मी एम्. बी. बी. एस्. तर ही एम्. ए. म्हणूनच ही मला प्रेमानें बोलावते आणि लहानपणीं जिवलग असलेल्या मैत्रिणीला टाळते अं ! खरोखर आम्हां दोघींपेक्षां वसुमतीलाच ऐश्वर्य भोगण्याचा जास्त अधिकार नाहीं काय ? वसुमतीचा स्वभाव किती राजस ! तिचं मोहक सौंदर्य, रुबाबदार वागणं नि मनमिळाऊ, हंसरा, उमदा, स्वभाव. अशा मुलीला उत्तम पति, संतति, संपत्ति असं वैभव मिळालं तर आनंद मानायचा कीं तिचा हेवा करायचा !'

पण माझे विचार मीं शक्य तोंवर लपवून विचारलें, " वरदा, तूं लग्न कसं केलं नाहींस ?"

वरदा हंसून म्हणाली, " मीं तोच प्रश्न तुला केला तर ?"

" अग मीं पहिल्यापासूनच ठरवलं होतं लग्न करायचं नाहीं म्हणून. पण तूं लग्न करणार नाहींस अशी मला म्हणजे आम्हांला कुणालाच कल्पना नव्हती. केवढी रोमँटिक मुलगी होतीस तूं."

वरदा हंसली. किती उदासवाणें पण !

मला अचानक आठवण झाली. वरदेच्या ओळखींतला कुणी मुलगा होता. अतिशय हुषार होता तो. त्याच्याबद्दल वरदा आमच्या-जवळ नेहमीं मोठ्या प्रशंसेनें बोलत असे. आणि आम्ही तिला चिडवीत असूं, अन् ती लाजत असे.

आम्ही मॅट्रिक झालों तेव्हांच तो मुलगा इंग्लंडला गेला. त्या मुलाचा आणि वरदेचा वाङ्निश्चय झाला असल्याचें वसुमतीच्या पत्रांत आलें होतें. मी त्या वेळीं दिल्लीला होतें व त्या दोघी पुण्याला कॉलेजांत होत्या.

काय बरं त्या मुलाचं नांव ? बंगाली पद्धतीचं मोठं काव्यमय नांव होतं. हं, शशिवदन.

आडनांव ? आडनांव कांहीं केल्या मला आठवेना.

वरदा माझ्या कामाबद्दल मला कांहीं प्रश्न विचारीत होती, मी तिला उत्तरें देत होतें आणि इकडे माझें डोकें मात्र तें नांव आठवण्याच्या प्रयत्नांत होतें.

टांग्यांतून उतरतांना मीं तिला विचारलें, " वरदा, तुझ्या गळ्यांतल्या लॉकेटमध्यें फोटो होता त्यांचं आडनांव काय ग ?"

वरदेनें तीव्र दृष्टिक्षेप करीत रूक्षपणें विचारलें, " काय करायचं तुला तें नांव ?"

" कांहीं नाहीं. आपलं उगीच." मीं जरा विरमून बोललें.

आम्ही घरांत गेलों. वरदा आणि तिची आत्या अशा दोघीच काय त्या होत्या. त्या आत्यानेंच पोरक्या वरदेचें पालनपोषण व शिक्षण केलें होतें.

माझी त्या आत्याबाईशीं ओळख असल्यामुळें त्यांनीं माझें मोठ्या प्रेमानें स्वागत केलें आणि त्यांना बघून मलाहि आनंद वाटला. पंधरासोळा वर्षांची एक मुलगी आत्याबाईना कामाला मदत करीत होती. तिलाहि वरदेनें माझी ओळख करून दिली.

माझें स्नान व माझ्या आवडत्या श्रीखंडपुरीचें जेवण झाल्यावर आम्ही दोघी वरदेच्या खोलींत गप्पागोष्टी करूं लागलों, परंतु गप्पांना रंग येईना. आम्ही पूर्वीचा जिव्हाळा निर्माण व्हावा म्हणून थट्टामस्करीचा प्रयत्न करीत होतों, पण मध्यें वीस वर्षांचा बांध पडलेला. धरण बांधलेल्या नदीचें पाणी दोन्ही बाजूंला सारख्या जोरानें कसें वाहणार? त्याचा जोर कमी होणारच. त्याच्या वाहण्यांत कृत्रिमता येणारच.

नंतर तीन वाजतां जरा वामकुक्षी करावी म्हणून मला वरदेनें आग्रहानें बिछाना उलगडून दिला आणि मी नको नको म्हणत असतां मला स्वस्थता मिळावी म्हणून ती शेजारच्या खोलींत निघाली.

पण जातां जातां उंबऱ्यावरून ती मागें फिरली आणि माझ्या-जवळ येऊन हलकेंच म्हणाली, "त्यांचं नांव शशिवदन देशमुख."

मी ताडकन् बिछान्यावर उठून बसलें. वरदा घाईघाईनें जाऊं पाहत होती. तिचा हात धरून मीं तिला विचारलें, "वरदा, वसुमतीचे पति म्हणजेच—"

वरदेनें शांतपणें माझें वाक्य पूर्ण केलें, "शशिवदन देशमुख."

" वरदा, मला माहीत नव्हतं. नकळत मी तुझ्या भावना दुखवल्या. तूं वसुमतीला कां बोलावलं नाहींस त्याचं कारणहि मला समजलं. "

" तें समजावं म्हणूनच सांगितलं तुला मीं. "

" पण असं कसं झालं, वरदा ? तुमचा वाङ्‌निश्चय झाला होता ना ? "

वरदेनें एक निःश्वास टाकून म्हटलें, " नशीब माझं ! "

वरदा चटदिशीं निघून पलीकडल्या खोलींत गेली.

मला उदास वाटूं लागलें. मीं बिछान्यावर अंग टाकलें. मला अतिशय वाईट वाटत होतें. वरदा भग्नहृदया झाली होती. वसुमति त्याला कारण होती.

पण मला हा विचार क्षणमात्र पटेना. लगेच त्याला कलाटणी मिळाली, ' वसुमति केवळ अप्रत्यक्ष कारण झाली असावी. वरदेचाच कांहीं दोष असेल. '

माझा जरा डोळा लागला असावा. कारण मला वसुमतीची हांक ऐकूं आली. मला वाटलें ती हांक स्वप्नांतलीच होती. पण ती हांक स्वप्नांतली नव्हती.

वसुमतीनें गदगदां हलवून मला जागें केलें. ती म्हणाली, " मी येणार नाहीं असंच वाटलं होतं ना पण तुम्हांला दोघींना ? पण आलेंना न बोलावतां ? "

नंतर माझ्या उत्तराचीहि अपेक्षा न करतां दोन्ही हात तोंडावर ठेवून आश्चर्याचा अभिनय करून ती बोलली, " लाशिनी, याक ग तूं ठलीच्या ठली लाझीस ! "

मला कमालीचें हंसूं लोटलें. काना, मात्रा, वेलांट्या जशाच्या

तशाच ठेवून अक्षरांची तेवढी उलटापालट करायची अशी आमची एक भाषा होती, त्याच भाषेंत वसुमति मला म्हणाली होती, " शालिनी, काय ग तूं लठ्ठीच्या लठ्ठी झालीस !"

अगदीं पूर्वीचीच ती पोरकट, आनंदी नी गडबडी, बोलकी वसुमति ! पस्तीस वर्षांची असून पंचविशींतल्यासारखी दिसत होती. गोंडस शरीरयष्टि व मोहक चेहऱ्यावर मुसमुसणारा आनंद. तिला बघूनच माझें मन प्रसन्न झालें.

तिच्याशेजारीं उभी असलेली वरदा किती पोक्त दिसत होती. वास्तविक आम्हां तिघींमध्यें तीच वयानें लहान. अन् तिचें सौंदर्यहि रेखीव होतें, पण आतां तें सौंदर्य तेजोहीन दिसत होतें. तिच्या शरिरांत काटकुळेपणा आला होता.

वसुमतीला बघून मला अतोनात आनंद झाला. पण वरदेचा आनंद मात्र वरवरचा होता हें उघड दिसत होतें. वसुमति तिच्याशीं मोकळेपणानें बोलण्याचा प्रयत्न करीत असून ती गोंधळल्यासारखी झाली होती. आमच्या भाषेंत वसुमति बोलली तेव्हांसुद्धां उगीच फिकट हंसली होती ती.

मला तिचा राग आला. मीं तिच्याकडे तिरस्काराचा दृष्टिक्षेप केला आणि त्या दृष्टिक्षेपानें तिचें मुख पांढरेंफटक पडलें, इकडे लक्ष न देतां मी उपारोधानें म्हणालें, " आपण संकेताप्रमाणें जमलों तर खऱ्या. मग आतां आपलीं सत्कार्ये तरी वर्णन करूं या. बघूं या तर ' स्वभावाला औषध नाहीं ' हेंच खरं कीं काय तें ? कीं ' लहानपणीं स्वभाव कळत नाहीं ' तें खरं ? "

वसुमतीनें वरदेकडे चटदिशीं पाहिलें. वरदेनें मान खालीं घातली.

त्या गूढ अभिनयांतला अर्थ शोधण्याच्या प्रयत्नाला मी लागतें तों बरदा हंसून खेळकरपणानें म्हणाली, "गोष्टी बोलायला आपल्याला ढीग वेळ आहे. ही बसुमति इतक्यांतच आली आहे गाडींतून. तेव्हां मी चहा नि फराळाचं घेऊन येतें."

"अग पण, बरदा, तूं स्वतः कशाला निघालीस? आत्याबाई करतील कीं चहा," बसुमति म्हणाली. "ती कोण मुलगी आहेच कीं मदतीला."

"आत्याबाई चहा करतील, पण तुला जो कांहीं स्पेशल फ्लेव्हरचा चहा लागतो तो कुठें त्यांना जमतो? त्या हैद्राबादी चटणीचे पोहे तुला आवडतात ना? ते नि पोह्याचे पापड आणि या शालिनीकरितां कालच दह्याच्या केक्स करून ठेवल्या आहेत त्या, असं सगळं मी घेऊन येतें पंधरा मिनिटांत. तुम्ही बसा तोंवर बोलत."

"आमच्या आवडीनिवडी आम्हीसुद्धां विसरलों कीं ग, बरदा." मीं म्हटलें.

बरदा हंसत हंसत निघून गेली.

बरदेशीं बोलतांना जो एक संकोचाचा पडदा तिच्या-माझ्यामध्यें उभा होता त्याचा लवलेशसुद्धां आतां बसुमतीशीं बोलतांना उरला नव्हता. बरदा प्रथमपासूनच जरा गंभीर, त्यांत आतां ती अनुभवानें अधिकच गंभीर झाली होती. सूक्ष्म दुःखानें तें दडपण पुष्कळच वाढवलें होतें. आल्यापासून खरीखुरी मनमोकळेपणानें हंसलेली मीं कांहीं तिला बघितली नाहीं. मला प्रथम आगगाडीच्या डब्यांत बघून तिला इतका मनापासून आनंद झाला होता ना, पण तेव्हांसुद्धां तिच्या डोळ्यांत आसवांनीं गर्दी करून सोडली होतीच.

वसुमतीचे यजमान धारवाडला कलेक्टर होते. फिरतीवर असतांना आलेले गमतीचे अनुभव, मुलांच्या बाललीला आणि नवीन पद्धतीच्या केलेल्या दागिन्यांचें वर्णन करतां करतां वसुमति रंगून गेली. किती हंसत होती ती ! हंसतांना पुढेंमागें होऊन मग एकदम डावीकडून उजवीकडे एक अर्ध चक्कर घेण्याची तिची लकब असे. हंसतांना तिच्या डोळ्यांना पाणी येई. बरोबर ती लकब अजून कायम असलेली बघून मला मनस्वी हंसूं आलें आणि मी वसुमतीची नक्कल करून जरा थट्टासुद्धां केली.

त्याबरोबर वसुमति म्हणाली, " अन् तूं तरी कुठं बदलली आहेस ! लोकांच्या संवयींची नक्कल करण्याचा तुझा स्वभावसुद्धां कायम तो कायमच दिसतो आहे."

आम्ही यावर खूप हंसलों. तितक्यांत फराळाचें घेऊन वरदा वर आली. तिसऱ्या मजल्याच्या जिन्याकडे ट्रेसह जातांना ती आम्हांला म्हणाली, " चला आपण वरल्या गच्चीवर बसूं या."

गच्चीवरून नवीन नवीन इमारतींनीं सुशोभित झालेल्या पुण्याचा विस्तार मोठा सुंदर दिसत होता. त्यावर मावळत्या सूर्याचीं सोनेरी किरणें पडून नाटकाच्या पडद्यावर रंगवलेल्या शहराच्या चित्राप्रमाणें मनोहर देखावा दिसत होता. लाल दिसणारीं तीं मंगलोरी कौलें, उन्हांत तळपणारे पत्रे आणि साधीं तपकिरी कौलें आणि कुठें पिवळसर झोपड्या, हिरवींहिरवीं शेतें व जमिनी, यांच्याकडे वरून बघतांना वाटत होतें कीं हीं रंगीबेरंगी बस्त्रेंच वाळत घातलीं आहेत.

पर्वतीवरलीं तीं देवळें, कोनाड्यांत ठेवल्यासारखी ती चतुःशृंगी, रेमार्केटचें कौलारू शिखर, ससून हॉस्पिटलचें टॉवर या

ओळखीच्या ठिकाणांची ओळख पटतांच मला मोठी मौज वाटत होती. मनांत विचार आला कीं, 'वीस वर्षात या पुण्यांतील लोकांच्या जीवनांत काय काय बरं अद्‌भुतरम्य प्रसंग घडून आले असतील!'

" काय येवढी बघतेस, शालिनी! मनाचे मनोरे दिसताहेत कीं काय तरी!" बोलणारी वसुमतीच होती.

" मनाचे मनोरे बघायला मी कांहीं सोळा वर्षांची नाहीं म्हटलं. पण वरदा, ही वसुमति मात्र अगदीं सोळाव्या वर्षात असल्यासारखीच राहिली आहे नाहीं!"

" तुम्हांला हल्लीं गार चहा आवडूं लागलाय कीं काय! लागा ना लवकर फराळ.करायला." वरदा बोलली.

पुन्हां उडवाउडवी!

फराळ करतां करतां आम्ही गप्पागोष्टी करूं लागलों. हळूहळू त्या गप्पांना रंग चढत चालला होता.

माझा धंदा वैद्यकीचा. रुग्णांशीं सतत परिचय. हालअपेष्टा, गरिबी यांच्यांतच वावरल्यानें अनुभवांना कांहीं तोटाच नव्हता. रात्रीचीं जाग्रणें, उपासतापास, शुश्रूषेचे कष्ट यांनींच माझें आयुष्य खचलेलें. स्त्रीजीवनांतील नानाविध दुःखें ऐकतां ऐकतां माझ्या मैत्रिणींच्या डोळ्यांना पाणी आलें.

वरदा आदरानें माझ्याकडे बघत म्हणाली, " शालिनी, अविवाहित राहून लोकसेवा करायची हें तूं लहानपणापासून ध्येय ठरवलं होतंस, त्याप्रमाणें खरोखरीच तूं वागते आहेस."

"मीं या गोष्टी तुम्हांला सांगितल्या त्या कांहीं फुशारकीसाठीं नव्हेत हो," मी म्हणालें. "आपले अनुभव आले ते सांगितले इतकंच." मीं वरवर असं म्हणालें तरी मनांतून मी खुशालून गेलें होतें.

वसुमतीनेंहि पुष्कळ गंमती सांगितल्या. तिनें शशिवदनांच्याबरोबर युरोपची सफर केली होती. तेव्हां नानापरीचे देश, नानापरींचे लोक आणि रीतिरिवाज या माहितीमुळें तिचें बोलणें फार मनोरम वाटत होतें. हिंदुस्थानांतल्या जिल्ह्याजिल्ह्यांतून हिंडतांना तिचाहि दारिद्र्य, दुःख यांच्याशीं परिचय घडला होता. संपत्ति आणि अधिकार यांच्या जोरावर तिनें गरिबांच्या गांजणुकीला यथामति आळा घातला होता. कितीक इस्पितळांना व लोकोपयोगी संस्थांना तिनें मदत केली होती, आणि कितीक बायाबापड्यांना वेळोवेळीं आश्रय दिला होता.

मला वसुमतीचें फार कौतुक वाटत होतें. वरदा मात्र एक शब्द न बोलतां ऐकून घेत होती. मला वाटलें, 'अपजय पत्करायला देखील मनाचं औदार्य लागतं. तें वरदेजवळ कुठून सांपडणार !'

मी तिला म्हटलें, "वरदा, आम्ही इतक्या बोलतों आहों, अन् तूं आपली घुमीच राहिली आहेस. तुझे कांहीं अनुभव सांगशील कीं नाहीं ?"

वरदा रूक्ष स्वरांत म्हणाली, "माझे कसले अनुभव ! मी एम्.ए. झालें अन् आतां शाळेंत नोकरी करतें आहें. पुण्यांतच माझा जन्म गेला. शाळेंतल्या लहान लहान मुलींना शिक्षण द्यायचं, त्यांच्यांत मिसळायचं यापलीकडे मला फारसं सामाजिक जीवन नाहींच."

"पण ती आतां खालीं बघितली ती मुलगी कोणाची ? तुझ्या घरींच राहते कीं काय ?" वसुमतीनें सहज विचारलें.

"हं हं, सुशी होय ? अतिशय हुषार मुलगी. तीनचार भावंडांतली आहे. घरची गरिबी, खायला पुरेसं नाहीं. तेव्हां या मुलीचा मी संभाळ करतें. आज सातआठ वर्षें ती माझ्याजवळच

आहे. तिला खूप शिकवायचं मनांत आहे माझ्या. तिच्या बुद्धीचं चांगलं चीज झालं पाहिजे." वरदा आपले मनोरथ उत्कंठेनें आमच्याजवळ बोलून दाखवीत होती. "सुशीला सोळावं वर्ष नुकतं लागलं, पण ती मॅट्रिकमध्यें आहे. तिची बहीण कमीसुद्धां हुषार आहे. तिलाहि फी वगैरे देतें मी मधूनमधून."

वरदा त्या दोघींच्या हुषारीबद्दल इतक्या अभिमानानें बोलत होती कीं जणूं त्या तिच्याच मुली होत्या! ती जें सत्कृत्य करीत होती त्याची तिला जाणीवहि नव्हती. अगदीं सहजगत्या म्हणून ती गोष्ट आम्हांला कळली. वसुमतीनें प्रश्न विचारला म्हणून, नाहीं तर मी समजत होतें कीं, वरदेनें वर्गातल्याच मुलीला आजच्यापुरती मदतीला बोलावली होती.

वरदेबद्दल मला पुष्कळ बरें वाटूं लागलें. थोडाबहुत पैसा तरी ती सत्कार्यात खर्चीत होती!

मी वरदेचा गौरव करूं लागलें, पण ती ओशाळून गेली. "इश्श! पराचा कावळाच करते आहेस तूं. अन् पाह्यलंत कां? नऊ वाजले. जेवायला जाऊं या आपण." तितक्यांत सुशीच आम्हांला बोलावण्याकरितां वर आली. आम्ही मग खालीं गेलों.

जेवतांना वसुमति फारशी बोलत नव्हती. वरदा मात्र आतां पूर्वीप्रमाणेंच मनमोकळेपणानें बोलूं लागली होती. जेवल्यावर आम्ही चांगल्या बारा वाजेपर्यंत जागत बसलों होतों. तरी वसुमति गप्पगप्पच होती. मला पुन्हां विस्मय वाटला. त्या दोघींच्या मानसिक धाग्यादोऱ्यांची गुंतागुंत मला उकलेना.

शेवटीं वरदा म्हणाली, "वसुमतीला झोंप आलेली दिसतेय. चला आतां पुरे झाल्या गप्पा."

आम्ही बिछान्यावर पडलों. मी आणि वसुमति एका खोलींत होतों. वरदा आणि सुशी दुसऱ्या खोलींत झोंपल्या होत्या.

वसुमतीची तळमळ चालू होती. मी बोललें तरी ती नुसती हो नाहीं करीत होती. तिच्या मुखावर काय भावना उमटत होत्या त्या मला दिसत नव्हत्या. पण मला त्यांची खळबळ जाणवली.

पण मी बोललें नाहीं. याप्रमाणें दोन तास गेले. दोहोंचे टोले पडले आणि वसुमति बिछान्यावरून उठून माझ्या बिछान्याशीं आली.

मी पण आश्चर्यचकित होऊन उठून बसलें.

" झोंप नाहीं ना अजून आली तुला ? " वसुमतीनें मला प्रश्न केला. तिचा आवाज किती बदललेला येत होता ! मला कसेंसेंच झालें.

" शालिनी, तुला एका अतुलनीय स्वार्थत्यागाची गोष्ट सांगायची आहे. "

" म्हणजे काय ? कुणाचा स्वार्थत्याग ? "

" ऐक ना, म्हणजे समजेल तुला. "

" मग उद्यां सांगितलंस तर नाहीं का चालणार ? आतां विश्रांति घेऊं या ना जरा. "

"नाहीं, नाहीं. आतांच सांगतें मी. चल, आपण गच्चीवर जाऊन बसूं. नाहींतर यांची झोंपमोड होईल. "

वसुमतीच्या मनांत गोष्ट आली कीं ती घडलीच पाहिजे असा लहानपणींचा ठरावच होता. मीं तिचें ' स्वीट लिटल् टायरंट् ' असें नांव ठेवलें होतें.

आतांहि मी कंटाळलें होतें तरी उठलें आणि चालूं लागलें.

आकाश जांभळ्या मखमलीसारखें दिसत असून असंख्य चांदण्या सोनेरी टिकल्यांप्रमाणें चमकत होत्या.

वसुमति पुन्हां निःस्तब्ध झाली. कसं सांगावं याचा जणूं ती विचार करीत होती.

मी उत्कंठित झालें होतें.

आणि मग वसुमतीनें माझा हात आपल्या हातीं धरून सांगण्यास सुरुवात केली--

" शालिनी, मीं तुला माझ्या लग्नाची हकीकत कळवली त्या वेळीं आणि त्यानंतरहि शशिवदन हें नांव टाळून मी मुद्दामच मि. देशमुख म्हणून लिहीत असें. कारण शशिवदन म्हणजेच वरदेचे वाङ्‌निश्चित वर, हें तुझ्या लक्षांत आलं असतं म्हणून मी तें नांव टाळीत आलें."

" मग, वसुमति, आतां तरी त्या पूर्वीच्या गोष्टी कशाला सांगतेस मला ? "

" नाहीं नाहीं. आजपर्यंत मी गप्प बसलें हेंच वाईट झालं. आतां आज जर मीं खऱ्या गोष्टी तुला सांगितल्या नाहींत तर तें नीचपणाचं होईल. "

वसुमति आवेगाच्या भरांत बोलत होती.

" ऐक ना, शालिनी, माझं मन आज मला हलकं करूं दे. शशिवदन इंग्लंडहून परत आले तेव्हां मी आणि वरदा बी. ए.च्या वर्गात होतों. नोकरीच्या गांवीं जाण्यापूर्वी शशिवदन तीन महिने पुण्यांत होते. ते वरदेकडे नेहमीं येत. त्याच वेळीं माझी त्यांच्याशीं ओळख झाली आणि--आणि माझी कल्पना नसतांना माझं त्यांच्यावर प्रेम बसलं. "

" आणि शशिवदनांचं ? " मीं विचारलें.

"शशिबदनांच्यावर वरदेचं जसं एकनिष्ठ सात्त्विक प्रेम होतं तसं, तितकं जरी त्यांचं तिच्यावर नसलं तरी वाग्दत्त वधू म्हणून आणि शिवाय तिचा स्वभाव त्यांना आवडत असल्यामुळें त्यांचंहि तिच्यावर प्रेम होतं. वरदेइतकं प्रेम त्यांनीं कुणावरहि केलेलं नाहीं."

"तुझ्यावर?"

"माझ्यावर त्यांचं प्रेम आहे, पण वरदेवर त्यांचं जसं प्रेम होतं त्याची सर या प्रेमाला नाहीं." वसुमति आपली हृदयव्यथा शब्दांनीं उकलून दाखवीत होती.

"मग तुझं नी त्यांचं लग्न कसं झालं?"

"तेंच तर तुला सांगायचं आहे. वरदा बी. ए. झाल्यावर लग्न करायचं असं त्या दोघांचं ठरलं होतं. म्हणून तीन महिन्यांनीं ते आपल्या नोकरीवर रुजू होण्यासाठीं परगांवीं गेले. नंतर ते जेव्हां जेव्हां म्हणून पुण्याला येत तेव्हां तेव्हां माझं प्रेम अधिकाधिक वाढतच गेलं. मी आटोकाट प्रयत्न करीत असून माझें मन ताब्यांत येईना. माझ्या प्रकृतीवर याचा परिणाम होऊन मी पुढें एकदां चांगलीच आजारी पडलें. त्या आजारांत वरदेनं माझी जिवापाड शुश्रूषा केली आणि त्याच आजारांत माझं गौप्य तिला उमगून आलं. वरदेनं माझ्या सुखाकरितां आत्मयज्ञ केला. तिनं एक कारस्थान रचलं आणि तें मीं शशिवदनांना सांगतां कामा नये म्हणून तिनं मला निक्षून सांगितलं आणि मी मोहाला बळी पडून सारासारविचार बाजूला सारला. एके दिवशीं शशिवदनांना तिनें पाठविलेल्या पाकिटांत दुसऱ्याच कुणाला लिहिलेलं प्रेमपत्र त्यांना आढळून आलं. शशिवदन तडक पुण्याला आले आणि त्यांनीं वरदेबद्दल माझ्याजवळ—वरदेच्या जिवलग

मैत्रिणीजवळ–चौकशी सुरू केली आणि वरदेनं पढवून ठेवल्याप्रमाणं मीं तिच्याविरुद्ध गोष्टी त्यांना सांगितल्या. वरदेनं स्वतः आपलें दुसऱ्यावर प्रेम असल्याचें कबूल केलें.

शशिवदनांना केवढा धक्का बसला त्या वेळीं. त्यांनीं नंतर माझ्यासमक्ष एक दिवस वरदेचा जो धिक्कार केला तो मला ऐकवेना. मी खरं सांगण्याच्या बेताला आलें होतें, पण तिनं मला खुणा करून बोलूं दिलं नाहीं.

प्रेमांध झालेली मी. मला त्या वेळीं इतकं समजलं नाहीं कीं, वरदेची शशिवदनांच्या प्रेमाबद्दल खात्री होती. ते सहजासहजीं माझ्याशीं लग्न करायला तयार होणार नाहींत हें तिला माहीत होतं. तिच्याबद्दल त्यांच्या मनांत तिरस्कार उत्पन्न करणं हाच काय तो माझ्या प्रेमपूर्तीचा उपाय होता आणि तोच तिनं शोधून काढला होता.

मी आणि वरदा त्या दिवसानंतर बोललों नाहीं. मला वरदेसमोर अपराध्याप्रमाणें वाटत असे.

पुढें एक वर्षानं आमचं लग्न झालं. वरदा आली नव्हती.

आम्हांला तीन गुणी अन् हुषार मुलं झालीं आहेत. आम्हांला कुठेंहि कांहीं कमी नाहीं. माझं शशिवदनांवर अखंड प्रेम आहे. पण माझ्या प्रेमाची पूर्ति मैत्रिणीच्या सुखाचा बळी दिल्यानं झाली आहे ही गोष्ट मला सतत डांचते. शशिवदन वरदेला विसरलेले नाहींत. ”

“ वसुमति ! ”

“ वरदा ! ” आम्ही दोघी एकदम दचकलों.

" वसुमति, काय सांगत होतीस तूं शालिनीला ? " वरदेचा स्वर नाराजीचा होता. त्यांत कंपही होता.

" वरदा, शशिवदनांचं अजूनहि तुझ्यावर प्रेम आहे असं मी हिला सांगत होतें. "

" कशावरून म्हणतेस तूं हें ? मला ते—मी त्यांच्याशीं प्रतारणा केली तरी ते माझ्यावर प्रेम करतात ? " वरदेचा स्वर बोंचरा होता. म्हणून ती हंसली तें सुद्धां किती कर्कश !

" होय, वरदा, शशिवदन अजूनहि तुझ्यावर प्रेम करतात. मी धारवाडला नुकतीच एके दिवशीं एका मैत्रिणीकडे गेलें होतें, पण दुसऱ्या बायका तेथें आल्यामुळें मी बरीच लौकर घरीं आलें. शशिवदन आपल्या खोलींत बसले होते, असं नोकरानं सांगितल्या-वरून मी तेथें गेलें अन् मुद्दाम हळूंच पाठीमागून त्यांचे डोळे झांकण्याकरितां जवळ गेलें. "

वसुमति व्यथित स्वरांत सांगूं लागली.

" अन् बघतें तों शशिवदन तुझा बी. ए. मध्यें असतांना काढलेला फोटो एकाग्रतेनें पाहत होते. त्या भरांतच त्यांनीं उद्गार काढला, ' मीं वरदेवर अविश्वास धरला. मी तिला विश्वासघातकी समजलों. रागानें आंधळा बनून मीं तिच्या शुद्ध प्रेमाचा संशय घेतला. त्या अपराधाबद्दल शासन म्हणूनच मी वरदेला मुकलों. '

मी जशी चोरपावलांनीं खोलींत आलें होतें तशीच पुन्हां निघून गेलें. इतकीं वर्षे एकत्र संसार केल्यानंतर मला ते शब्द ऐकावे लागले, हें मलाहि भयंकर शासन मिळालं. " वसुमतीला भावना-कुलतेनें बोलवेना.

मीं मनांत म्हटलें, ' वरदेच्या निस्सीम प्रेमाचा आणि अतुलनीय स्वार्थत्यागाचा विजय आहे हा. '

आपल्या हृदयांतील अनिवार खळबळ दाबून टाकण्याकरितांच कीं काय वरदेनें छातीवर दोन्ही हात दाबून धरले. तिनें भीतियुक्त पण अस्पष्ट स्वरांत विचारलें, "म्हणजे त्यांना सगळं समजलं कीं काय?"

" आमच्या लग्नानंतर तुझं शिक्षण संपल्यावरहि तुझं लग्न झालं नाहीं तेव्हांच सर्व त्यांच्या लक्षांत आलं असावं. पण त्यांचं हृदय अति थोर असल्यामुळें त्यांनीं मला तशी ओळख कधींहि दिली नाहीं किंवा तुझं नांवहि कधीं उच्चारलं नव्हतं. पण त्या दिवशीं तुझा फोटो पाहतांना मीं बघितलं तेव्हां मला सर्व कळून आलं.

वरदा, मी आज इथें मुद्दाम आलें. मला वाटलं होतं तूं आज खरी गोष्ट शालिनीला सांगणार. पण तुझ्या थोरपणानं तूं मला आणखीच लाजवलंस. वरदा, मीं तुझं सुख बळकावलं त्याबद्दल मी उद्यां शशिवदनांना सर्व सांगणार अन् त्यांच्यासमक्ष आणि शालिनीसमक्ष तुझी क्षमा मागणार आहें. "

" शशिवदनांना सर्व सांगणार ! केवढा अविचार हा ! " वरदा भेदरून घाईघाईनें उद्गारली.

"हा अविचार नव्हे, वरदा ! मीं अविचार केला पण पूर्वी केला. इतकीं वर्षें गप्प बसण्यांत केला. उद्यां मी त्या अविचाराचं परिमार्जन करणार आहें. "

वरदेनें वसुमतीचे हात आपल्या दोन्ही हातांनीं घट्ट दाबीत आवेगभरांत म्हटलें, " तूं त्यांना मुळींच कांहीं सांगतां कामा नये. त्यांना अज्ञानांत ठेवणं हेंच तुझ्या आणि त्यांच्याहि सुखाच्या दृष्टीनं इष्ट आहे. त्यांना मी निरपराधी वाटत असलें तरी तूंहि

निरपराधी आहेस असंच त्यांना वाटत राहालं पाहिजे. तूं मला मदत केलीस हें त्यांना कळतां उपयोगीं नाहीं. नाहींतर त्यांना तुझा तिरस्कार वाटूं लागेल."

"ती शिक्षा मला योग्यच होईल !" वसुमति म्हणाली.

"नाहीं नाहीं, तें कांहीं नाहीं. या बाबतींत तुला माझं ऐकलंच पाहिजे. तुला ऐकायला लावण्याचा मला अधिकार आहे. तूं शालिनीला सर्व सांगितलंस हीसुद्धां चूक केलीस. पण त्यांना–शशिवदनांना–तूं अवाक्षर सांगतां कामा नयेस. मी त्यांना भेटणारच नाहीं मुळीं." वरदा भावनावेगांत बोलत होती.

"वरदा !" वसुमतीच्या या एका उद्गारांत केवढा आदर भरलेला होता ! माझ्याहि हृदयांत आदरानें स्थान घेतलें होतें.

पण वरदेनें वसुमतीचे हात सोडून दिले व ती गच्चीच्या कठड्याजवळ जाऊन उभी राहिली. तिच्या मनांतली प्रचंड खळबळ तिच्या मुखावर स्पष्ट उमटली होती. भयंकर निराशा तेथें प्रतिबिंबित झाली होती. शून्य दृष्टीनें वरदा आकाशाकडे पाहत होती.

पाहतां पाहतां तेथें प्रसन्नता विलसूं लागली. पक्ष्यांप्रमाणें तिचे विचारहि कुठल्याकुठेंच भिरभिरत होते.

पूर्वदिशा उजळूं लागली होती. तिकडे पाहत असतां वरदेचें मुखमंडलहि उज्ज्वल दिसत होतें. अगदीं न कळत गळ्यांतील साखळींतलें लॉकेट तिनें बाहेर काढून हातीं धरलें होतें. त्याच्या मध्यभागचा बारीकसा हिरा चमचम चमकत होता.

---

# इंदिराबाईंची दिनचर्या

घर्र्र्कन् घड्याळाचा गजर सुरू झाला. बरोबर साडेपांच वाजले होते. इंदिराबाई पहांटेच्या साखरझोंपेंतून दचकून जाग्या झाल्या, पण उठून न बसतां जरा उजवा हात पांघरुणाबाहेर काढून उशागती घड्याळ होतें तेथवर लांबवून त्यांनीं गजर बंद केला. बिचारें यंत्र तें; गप्प बसलें. 'उठूं या पांच मिनिटांनीं' असें मनाशीं ठरवून पुन्हां अदबशीर पांघरूण घेऊन शेजारीं निजलेल्या बाळचेंहि पांघरूण व्यवस्थित करून इंदिराबाईंनीं डोळे मिटले. त्यांना झोंपेनें लौकरच गुंगवलें. पांच मिनिटांचा अर्धा तास झाला.

सहा वाजतां बाळ रडूं लागला. इंदिराबाईंनीं घड्याळाचा गजर बंद केला, तसा कां बाळ रडण्याचा थांबणार होता! त्याला आणखी जरा पुढ्यांत ओढून थापटूनथोपटून गप्प करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. पण भुकेनें गांगरलेला बाळ कांहीं थांबेना.

इंदिराबाईनीं त्रासिकपणानें कपाळाला आंठ्या घातल्या. पांघरूण पायांवरून हिसडून टाकलें आणि जांभई देत देत बाळला त्यांनीं मांडीवर घेतलें. त्याला लौकरच पुन्हां झोंप लागेल अशी त्यांना आशा असावी. जरा वेळानें बाळ निजला असें वाटून अलगद उचलून त्याला खालीं ठेवण्याचाहि इंदिराबाईनीं प्रयत्न केला, पण दचकून उठून बाळनें पुन्हां रडणें सुरू केलें.

बाळच्या रडण्यानें विष्णुपंत आणि दुसरीं दोन्ही मुलेंहि जागीं झालीं.

विष्णुपंतांनीं हात लांबवून जांभई देऊन हुंकार देतदेत आळस दिला आणि ते म्हणाले, " उठा झालं आतां. बाळ कांहीं आतां पोटपूजेशिवाय थांबायचा नाहीं अन् आम्हांलाहि चहाचं तीर्थ पाहिजे. आण त्याला जरा इकडे. "

हंसत हंसतच विष्णुपंतांनीं पत्नीकडून बाळला घेतलें आणि बाळशीं ते बोबड्या शब्दांत बोलूं लागले. त्यांच्या खेळवण्यानें बाळहि रडणें थांबवून हुंकार देत हंसूं लागला.

इंदिराबाईनीं उठून गाद्या गोळा केल्या व मुलांना घेऊन त्या मोरीवर गेल्या. मुलांना राखुंडी देऊन त्या स्वतःहि दांत घांसूं लागल्या.

" हं खायची नाहीं राखुंडी." नेहमींप्रमाणें इंदिराबाई मुलांना दरडावीत होत्या. " घाणेरडा मुलगा. थुंक ना. अरे सदऱ्याला काय तोंड पुसतोस? सगळा काळा केलास. बघी, थांब मी चूळ देतें तुला. नाहींतर झगा भिजवशील." दहा मिनिटांनीं हा समारंभ आटोपून माधवचा सदरा बदलून इंदिराबाई स्वैंपाकघरांत आल्या आणि त्यांनीं स्टोव्ह पेटवून चहा ठेवला.

" अरे राम राम ! सोन्याचा कळस केला हो तुमच्या चिरंजिवांनीं. घ्या लौकर याला." विष्णुपंत मोठ्यानें म्हणाले.

इंदिराबाई तशाच उठून बाहेर गेल्या आणि त्यांनीं बाळला घेतलें. विष्णुपंतांच्या हाताकडे पाहून त्या किंचित् हंसल्या. विष्णुपंतांनीं हातबीत धुऊन स्वैंपाकघरांत जातांना विचारलें, " कुठवर आलाय चहा ? "

" नुसतं चार कप पाणी ठेवलंय. साखरबिखर घालायचीच आहे."

विष्णुपंत आंत येतात तों माधव आणि बबी स्टोव्हच्या ज्योतीवर दोन काड्या पेटवून त्या जळत्या हातांत धरून त्यांची मजा पाहण्यांत गर्क झालीं होतीं.

विष्णुपंत एकदम ओरडले. " काय चाललंय, कुठें भाजलं म्हणजे मग ! टाकतां का नाहीं काड्या ! "

माधव आणि बबी दोन्ही मुलें घाबरलीं. दोघांनीं काड्या टाकल्या, पण बबीनें गळा काढला आणि ती आईकडे धांवत गेली. माधवहि चिमणीएवढें तोंड करून बसला.

इंदिराबाई शेण लावीत होत्या. बबीनें अचानक त्यांच्या मानेला बिळखा घालतांच त्यांनीं रागांतच तिला कोपरानें दूर लोटलें.

" काय झालं आतां घसा काढायला ! सकाळीं उठल्यापासून जीव जसा नको करून टाकतात. चूप चूप ! अगदीं रडायचं नाहीं."

हात धुऊन इंदिराबाईंनीं बाळला कडेवर घेतलें आणि कोपऱ्यांत रडत बसलेल्या बबीचा हात धरून तिला उठवीत व आपल्याबरोबर चालवीत तिला आंत नेलें.

इकडे माधवचें हिरमुसलें तोंड प्रसन्न करण्यासाठीं विष्णुपंतांनीं गोड बोलून त्याला फडताळांतून कपबशा आणण्याचें काम दिलें होतें. माधव एकदम दोन कप आणि दोन बशा हॉटेलांतलीं पोरें एकावर एक ठेवून आणतात तसें आणण्याच्या खटपटींत होता. तिकडे लक्ष जातांच इंदिराबाई ओरडल्या, "मध्या, फोडशील ना त्या कपबशा. परवां एक कप फोडलास की."

त्या ओरडण्यानेंच माधव इतका घाबरला कीं त्याच्या हातून एक कप निसटला आणि तो खळकन् फुटला.

इंदिराबाईंनीं बबीचा हात हिसकावून टाकला आणि खालीं वांकून माधवाच्या पाठींत एक जोराचा रट्टा ठेवून दिला. माधव, बबी आणि बाळ तिघांचाहि रडण्याचा प्रोग्रॅम सुरू झाला. इंदिराबाईंनीं तोंडाचा पट्टा सुरू केला.

विष्णुपंतांनीं सर्वांच्या कपांत चहा ओतला होता. ते आतां चिडून पत्नीला म्हणाले, "मींच त्याला सांगितलं होतं कपबशा आणायला. एखादी फुटली म्हणून एवढ्यानें मारायचें काय कारण? मुलंच तीं बोलून चालून."

"मग हें जाणूनच मोठ्या माणसांनीं त्यांना काम सांगायला पाहिजे. परवां एक कप फोडलाच त्यानं. अशानं महिन्याला दोन डझन कपबशा लागतील."

"बरं बुवा. मारा तुमच्या मुलांना. पण तें भोंगाणें थांबवा एकदां." विष्णुपंतांनीं कसाबसा चहा घेतला आणि बाहेर येऊन त्यांनीं ज्ञानप्रकाश उघडला.

इंदिराबाईंनीं मुलांना बशांत चहा ओतून दिला. बबीला बशी

उचलून त्या देतात तितक्यांत माधवनें स्वतःच बशी उचलून तोंडाशीं लावली. आणि त्या प्रयत्नांत निमा चहा त्यानें सदऱ्यावर सांडून घेतला. त्याची बशी सांवरायला इंदिराबाई लागतात तों इकडे बबीनें तीन घोटांचा चहा एकदम तोंडांत घेतल्यामुळें तिला ठसका लागला. तिचा झगा तर भिजलाच पण तिनें शिवाय खोकतां खोकतां रडण्यास सुरुवात केली. बाळ जरा कुठें मांडीवर गुंगला होता तो दचकून जागा होऊन रडूं लागला. त्यामुळें चिडून इंदिराबाईनीं पुन्हां दोन्ही मुलांना धपके दिले आणि बाळला पायावर घेऊन त्या त्याला दूध घालूं लागल्या. बाळचें रडणें थांबवण्यासाठीं मधून मधून चमच्यानें दुधाचें भांडें खडखडा-वीत त्या हेल काढून " हात ले काऊ! काय ज्यालं बालाला? हात ग बबी. बबी मोथी वाईत आहे. बालाला ललवते." असे बोबडे शब्द बोलत होत्या.

माधव आणि बबी यांनीं धपके खाल्ल्यावर लगेच बाहेर पला-यन केलें होतें. बाहेर जाईपर्यंत बबी गळा काढून रडत होती. पण दिवाणखान्याच्या दाराशीं जातांच तिचें रडणें आपोआप थांबलें. गालांवर अश्रूंचे ओघळ आणि तोंड मात्र हंसरें अशा थाटांत तिनें दिवाणखान्यांत प्रवेश केला आणि दोन्ही मुलें खेळण्याचा पसारा काढून खेळूं लागलीं. विष्णुपंत त्यांच्याकडे दुर्लक्ष करून शाळेंतले पेपर तपाशीत बसले.

बाळ दूध प्याल्याबरोबर निजला. त्याला माजघरांत अदबशीर निजवून इंदिराबाई स्वैंपाकघरांत आल्या. फुटक्या कपबशा, चहाचीं भांडीं, सांडलेला चहा यांची आवरासावर करण्यांत त्यांचा अर्धा तास गेला. नंतर भाजी निवडणें, चिरणें, डाळ-तांदूळ वगैरे

स्वैपाकाचें साहित्य काढणें या गोष्टी त्या करूं लागल्या. तें काम संपत येतें तों आठ वाजतां स्वैपाकीणबाई येऊन थडकल्या. प्रथम त्यांनीं तब्बल दोन कप चहा खास स्वतःसाठीं खूप साखर घालून करून घेतला. नंतर तीन शेगड्या पेटवून त्यांनीं एकीवर दोन घागरींचें पातेलें ठेवलें. दुसऱ्या दोहोंवर डाळ आणि आधण ठेवलें. अर्थात् गप्पागोष्टी करीत करीत या गोष्टी चालू होत्या.

इंदिराबाईनीं आपली वेणी घातली. बबीला त्या सारख्या हांका मारीतच होत्या. शेवटीं स्वतः जाऊन पाठींत एक धपका घालून त्यांनीं तिला घरांत आणलें. नंतर बबीच्या विवळण्या-ओरडण्या-नंतर बबीची वेणी आटपली.

स्वैंपाकीणबाईचें अंगधुणें आटोपल्यावर इंदिराबाईनीं मुलांच्या आंघोळी उरकून घेतल्या व त्यांना कपडे घातले. नंतर त्यांनीं स्वतःसाठीं पाणी ओतून घेतलें तों माधवच्या हातीं 'चार कप चहा पाहिजे' असल्याची वर्दी आली. आधींच त्रस्त झालेल्या इंदिराबाई अधिकच त्रासल्या. धाडकन् घंगाळावर पाट आदळून त्या पुन्हां स्वैंपाकघरांत आल्या आणि बडबड करीत करीत त्यांनीं रॉकेल काढून स्टोव्ह पेटविण्यास सुरुवात केली. पांच मिनिटांनीं स्टोव्ह नीट पेटला. आणि त्यावर सात कपांचें आधण पडलें. कारण स्वैंपाकीणबाईना चहा हवा होता, आणि मुलें तर मागणारच. म्हणून त्यांनाहि थोडाथोडा करणें भाग होतें.

चहा पिणें, भांडीं विसळणें वगैरे आवराआवर होते तों दहा वाजले. मंडळी चहा पिऊन केव्हांच गेली होती. दहा वाजले तेव्हां 'पाणी काढा' म्हणून विष्णुपंतांनीं माधवच्या हातीं निरोप पाठवला. पण तेवढ्यांत घाई घाई करून इंदिराबाईनीं चार तांबे

अंगावर ओतून घेतले आणि लुगडें लावून घेऊन, विष्णुपंतांच्याकरितां पाणी काढून त्या पाटपाणी करूं लागल्या.

विष्णुपंतांचें स्नान झाल्याबरोबर ते पाटावर येऊन बसले. बाई पोळ्या करीत असल्यामुळें इंदिराबाईनाच वाढणें भाग होतें. मुलेंहि जेवावयास बसलीं होतीं. सांडासांडी, रडारडी, हट्ट, रागें भरणें, मारणें आणि त्यावरून विष्णुपंत आणि इंदिराबाई यांच्यांत बोलाचाली झाल्यावर भोजनसमारंभ आटोपला. मध्येंच बाळहि उठला होता. विष्णुपंतांच्या मांडीवर त्याला इंदिराबाईनीं आणून ठेवलें होतें. त्याला घेऊन त्यांनीं त्याला दूध पाजिलें. मग बाहेर जाऊन विष्णुपंतांची कपड्यांची तयारी करून दिली. विष्णुपंत शाळेंत मास्तर होते. ते अकरा वाजतां घराबाहेर पडले. इंदिराबाई आंत आल्या. बाळ पुन्हां निजत होता, पण त्याला निजूं न देतां इंदिराबाईनीं त्याला न्हाऊं घातलें आणि मग निजवलें. मग त्यांनीं उष्टीं वगैरे काढलीं. बाईनीं एव्हांना दोन ताटें वाढून घेतलीं होतीं. दोघींचीं जेवणें उरकलीं. बाईनीं एका तासांत सर्व आवराआवर केली आणि त्या पसार झाल्या. इंदिराबाई जरा आडव्या झाल्या. पण जरा डोळा लागतो तोंच मुलांनीं भांडाभांडीची फिर्याद त्यांच्याकडे आणली. नुसतें रागें भरून तीं शांत होईनात तेव्हां पुन्हां त्यांना प्रसाद द्यावा लागला. पुन्हां त्या लवंडतात तों बाळ पुन्हां उठला. झोंपेची आशा सोडून आतां इंदिराबाई उठल्या. त्यांनीं स्टोव्ह पेटवून दूध गरम करून बाळला पाजलें.

बबी आणि माधव एवढा वेळ अंगणांत खेळत होतीं. तीं एकमेकांच्या कागाळ्या करण्यासाठीं म्हणून आंत आलीं. "आई, बबी नळावर खेळत होती ग. बघ तिनं सगळा झगा भिजवलान्."

बबी सांगत होती, " आई आई ग, माधव खोटं सांगतोय. मी नळावर हात धूत होतें. माधवच मातीच्चीं बोळकीं करीत होता. बघ सदला कसा भिजवलान त्यानं."

इंदिराबाई दोन्ही मुलांचा अवतार बघून बोलूं लागल्या, "काय आतां माणसानं करायचं! कपडे बदलायचे तरी किती? आणि शिवायचे तरी किती? रोज चार चार वेळां कपडे बदलायला लावतां. तुम्हांला मारून मारून माझे हात दुखतात, बांगड्या पिचतात, पण तुमची समजूत पडत नाहीं."

माधवचा मातीनें भरलेला सदरा काढून त्याला इंदिराबाईंनीं एक जुना सदरा घातला. बबीचा भिजलेला झगा काढून झग्याच्या अभावीं तिला माधवचा कोट घातला.

इतकें आटपतें तों शेजारच्या उमाबाई बसावयास आल्या. त्यांच्याशीं गप्पागोष्टी करतां करतां इंदिराबाईंनीं डाळ-तांदूळ निवडून टाकले. उमाबाईंनींहि त्या 'नको नको' म्हणत असतां त्यांना थोडीफार मदत केलीच. नंतर चहापाणी होऊन उमाबाई जातात तों विष्णुपंत शाळेंतून घरीं आले.

पंधरा मिनिटें इंदिराबाईंशीं गप्पा व मुलांचें कोडकौतुक झाल्यावर इंदिराबाई चहाच्या तयारीला लागल्या. मुलांनीं 'भूक भूक' करून त्यांना भंडावून सोडलें. सर्वांचीं खाणींपिणीं आटपल्यावर विष्णुपंत मुलांना घेऊन दिवाणखान्यांत गेले व इंदिराबाई चहाचीं भांडीं विसळूं लागल्या. तीं भांडीं विसळून होतात तों बाहेर मंडळी आल्यामुळें मुलें व त्यांच्याबरोबर चहाची वर्दीहि आंत आली.

इंदिराबाईनीं पुन्हां स्टोव्ह पेटवला, पुन्हां चहा केला, पुन्हां स्टोव्ह विझवून भांडीं विसळलीं तों पुन्हां नवीन मंडळी आल्यानें आणखी एकदां चहा करावा लागला. त्याबरोबर बाळला दूधहि इंदिराबाईनीं घालून घेतलें. तिन्हींसांजा झाल्या कीं, बाळ रडूं लागे. कांहीं केलें तरी तो राहत नसे. त्याला हिंडवण्या-फिरवण्यांत, त्याच्याशीं गोड बोलण्यांत इंदिराबाई दमून जात. बाळचें कळवळून रडणें ऐकून त्यांचें काळीज उलून जाई.

तेवढ्यांतल्या तेवढ्यांत त्यांनीं स्वैंपाकीणबाईला साहित्य काढून दिलें आणि तेल-दिवे करून अंथरुणेंहि टाकलीं. अंथरुणें घातलीं कीं त्यावर माधव आणि बबी यांचा गुधडा सुरू होई. त्यांची बडबड, हंसाहंशी, पडापडी, या सर्व गोंधळानें घर दणाणून जाई. त्यांना ‘ पुरे ’ म्हणतां म्हणतां इंदिराबाईना पुरें होई.

जेवतांना मुलें नेहमींच गोंधळ घालीत, त्यांतून रात्रीं त्यांना फारसें चापचूप कोणी करीत नसल्यामुळें त्यांना ऊतच येई. इंदिराबाई आणि विष्णुपंत दोघांना हा वेळ मोठा मजेचा वाटे. बाळ रडून दमल्यामुळें हा वेळपर्यंत झोंपीं जाई. घाई नसल्यामुळें इंदिराबाईहि नेहमींप्रमाणें बरोबरच जेवावयास बसल्या.

जेवणें आटोपल्यावर लौकरच काम आवरून बाई गेल्या. आंचवल्याबरोबर मुलें आपापल्या अंथरुणावर पडलीं आणि बोलतां बोलतां त्यांना झोंपेनें घेरलें. घर कसें शांत झालें.

नऊ वाजतां इंदिराबाईनीं बाळला पुन्हां दूध घातलें आणि तो जो निजला तो बारापर्यंत. इंदिराबाईना तास दीडतास झोंप मिळते तों त्यांना उठावें लागलें. बाळचें अंथरूण बदलून, त्याला गप्प करून निजवण्याचा त्या प्रयत्न करूं लागल्या. पण रोज रात्रीं

बाळला ऐन मध्यरात्रीं खेळण्याची लहर येई. खालीं ठेवला कीं तो रडे, पण मांडीवर घेतला कीं दिव्याकडे बघून हुंकार देऊन, पाय-हात नाचवीत हंसत असे. इकडे झोंपेनें पेंगलेल्या इंदिराबाई कौतुकानें त्याची लीला बघत. तास दीड तासानें बाळ पुन्हां निजे, मग मात्र पहाटेपर्यंत तो जागा होत नसे.

मध्यरात्रीं बाळला घेऊन बसल्या असतां इंदिराबाईंचा विचार चालला होता. 'काय बाई, फुरसत कशी ती होत नाहीं. उद्यां यांचा फाटलेला कोट आणि बबीचा फ्रॉक शिवलाच पाहिजे. मसाला संपून चार दिवस झाले. कशी मेली दिवसाकाठीं घटकाभर फुरसत मिळेल तर शपथ! सखुताई किती दिवस बोलावते आहे. जाईन जाईन म्हणतें रोज. पण—'

---

# खांचखळग्यांतला मार्ग

रात्रींचें जेवण नुकतेंच आटपलें होतें. गोलमेजावरल्या डबींतून सुपारीची चिमूट तोंडांत टाकून शालिनीनें दिवाणखान्यांतील भिंतीला लावलेल्या मोठ्या घड्याळाकडे सहज नजर टाकली, तों तिला साडेआठ वाजल्याचें दिसलें. तिला किंचित् हंसू आलें. सासर-हून ती माहेरीं आली म्हणजे अलीकडे तिला माहेरच्या वक्तशीर-पणाबद्दल नेहमींच गंमत वाटे. तिच्या मनांत विचार आला, 'बाबा आतां वरल्या हॉलमधल्या आरामखुर्चीवर पडले असतील, आई त्यांच्याशेजारीं सतरंजीवर बसून चांदीच्या पानाचा डबा उघडून दोन विडे लावीत इकडल्या तिकडल्या गोष्टी बोलत असेल, नंतर पांच मिनिटांनीं बाबा टेबलाशीं बसून व्यापारधंद्यासंबंधीं कागदपत्र पाहतील किंवा कोणी भेटायला आल्यास त्यांच्याशीं बोलत बसतील; तोंपर्यंत आई आंतल्या खोलींत कांहींतरी वाचीत बसेल, किंवा

आपल्याशीं गप्पा मारण्यासाठीं खालीं येईल.' शालिनीच्या मुखावर एकदम गांभीर्याची छटा आली. 'मग आज आईला सांगायचं का सगळं कांहीं ?'

चलित मन:स्थितींतच शालिनी दिवाणखान्याबाहेर आली. फरसबंदीवर बागेंतील दिव्यांचें बटन होतें. तें ओढतांच बागेंतील दिवे लागले. शालिनी हळूहळू पायऱ्या उतरून बागेंत आली व समोरल्या कारंज्याजवळ एक दगडी बाक केलेला होता त्यावर बसली. कारंज्याच्या चारी कोपऱ्यांवर खांब रोवून त्यावर तारांचे चार पिंजरे बसवलेले असून त्या पिंजऱ्यांच्या आंत विजेचे दिवे बसवलेले होते. पिंजऱ्यांवरून वेलाचे धुमारे गुंडाळून नेल्यामुळें आंतला दिवा न दिसतां चंद्रप्रकाशासारखा मंद, सोज्ज्वल प्रकाश तेवढा आजूबाजूला पडे.

'आई-बाबांचा संसार म्हणजे अथपासून इतिपर्यंत असाच स्निग्ध अन् शांत. त्यांत कधीं खांचखळगे नाहींत कीं भावनांची तीव्रता नाहीं.'

शालिनीच्या मनश्चक्षूंसमोर आपल्या आईची मूर्ति उभी राहिली. शालिनीची आई तशी कांहीं सुरेखांत जमा नव्हती, पण बाईटहि नव्हती. पन्नाशी उलटल्यामुळें निम्मे केस तरी पिकले होते. तोंडावरहि थोडीं थकल्याचीं चिन्हें दिसत. परंतु शांतपणा व डोळ्यांतील प्रेमळपणा हीं जशींच्या तशींच कायम होतीं. वागण्या-बोलण्याच्या पद्धतींत नेहमींचा रेखीवपणा होता—

" शालू, काय करतेस ग ? "

केवढ्यानें तरी शालिनी दचकली. तिनें वर पाहिलें तों सुशीलाबाई खिडकींत उभ्या असलेल्या तिला दिसल्या.

शालिनीनें हंसल्यासारखें करून उत्तर दिलें, "कांहीं नाहीं, आई, उगीच बसलेंय झालं बागेंत."

"वाचायचं नाहीं वाटतं आज कांहीं?"

"नाहीं, आज आलाय वाचायचा कंटाळा," शालिनीनें आळोखेपिळोखे देतच उत्तर दिलें.

"जराशानं मी पण येतेंच खालीं." खिडकींतील मूर्ति अदृश्य झाली.

शालिनीच्या मनाचा गोंधळ उडाला. आज पंधरा दिवस शालिनीच्या मनाची हीच स्थिति झालेली होती. ती आज पंधरा दिवस माहेरीं येऊन राहिली होती. आईबाबांना आनंद झाला, तसें आश्चर्यहि वाटलें. "कंटाळा आला, तुम्हांला भेटावंसं वाटलं म्हणून आलें झालं," असें तिनें सांगितलें होतें. यानंतर दोघांनींहि तिला जास्त कांहीं विचारलें नाहीं. पण शालिनीला केव्हां केव्हां वाटे, आपल्या येण्याला कांहीं विशेष कारण असलें पाहिजे अशी शंका आईला आली असावी; ती आपल्याला त्याबद्दल कांहींतरी विचारणार. आतां देखील शालिनीला वाटलें कीं, आज आई कांहींतरी विचारणार. आईला आपल्यावरील पेंचप्रसंग सांगणें शालिनीला अत्यावश्यकच होतें. पण आईला समोर पाहिलें कीं शालिनीचें धैर्य गळून जाई.

शालिनीला वाटे, 'आईचं आयुष्य म्हणजे नदीसारखं संथ आणि गंभीर. माझं आयुष्य म्हणजे ओढ्यासारखं. माझ्या आयुष्यांतल्या खळखळाटाची जाणीव आईला होणार कशी? माझ्या भावना आईला कशा समजणार? माझ्या पेंचप्रसंगाबद्दल आईला सहानुभूति कशी वाटणार?'

शालिनीच्या लग्नाला दोन वर्षें झालीं होतीं. शालिनी आपल्या वडिलांप्रमाणें सुंदर असून बी. एस्सी. झालेली होती. हुंडा पुष्कळ देण्याची ऐपत असल्यामुळें शालिनीला स्थळ मोठें चांगलें मिळालें होतें. तिचा नवरा शांताराम हा संपन्न घराण्यांतला, उच्च पदवीधर, मोठा पगारदार, प्रथमवर, देखणा आणि शिवाय उमद्या स्वभावाचा होता.

लग्नानंतर नोकरीच्या गांवीं शांताराम-शालिनी दोघेंच मोठ्या बंगल्यांत स्वतंत्र संसार करूं लागलीं. शालिनीला आपल्या लग्नानंतरचें गेलेलें पहिलें वर्ष आठवलें. गोड गोड आठवणी सगळ्या ! प्रत्येक गोष्टींत माधुरी होती. शालिनीचें हृदय हुरहुरलें. ‘ किती लवकर संपलें तें वर्ष ! वर्षसणाला आम्ही दोघं इथं आलों होतों. आईबाबांनीं केवढी मेजवानी दिली. आपल्याला हिऱ्याच्या कुड्या अन् त्याला हिऱ्याची अंगठी दिली. तो सगळा दिवस म्हणजे आनंदीआनंदांत गेला. पण त्याच रात्रीं आमचं पहिलं भांडण झालं. लग्नानंतर आमचं दोघांचं नक्की ठरलं होतं कीं, दोन वर्षेपर्यंत आपण दोघांनींच संसाराचा आनंद मनमुराद लुटायचा, मुलांमुळं त्यांत व्यत्यय येऊं द्यायचा नाहीं.’ एक वर्षपर्यंत शांताराम त्या बाबतींत कांहींहि बोलला नाहीं, पण वर्षसणाच्या दिवशीं मुलाविषयीं वाटत असलेली हौस त्यानं प्रदर्शित केली. ‘ आणखी एकदोन वर्षें तशींच जाऊं देत’ असें शालिनीचें म्हणणें होतें. या गोष्टीवरून दोघांत पुष्कळ वाद झाला. आधीं गोडीगुलाबीचें बोलणें, मग तत्त्वाचा प्रश्न म्हणून निग्रहाची भाषा अन् मग भांडण—अबोला, शांतारामचें दुसऱ्या दिवशीं तडक घरीं निघून जाणें—इतके प्रकार झाले. ‘नंतर पंधरा दिवस आपण माहेरींच होतों.

मग शांतारामनेंच माघार घेऊन आपल्याला घरीं नेलें. त्यानंतरचें वर्ष म्हणजे भांडण आणि मधला थोडा शांततेचा काळ असेंच गेलें. त्यांत खऱ्या सुखाला फारसा वाव मिळालाच नाहीं.'

शालिनीनें दुःखभरानें एक उसासा टाकला.

' कितीक वेळां तरी पड घ्यावी असें आपल्या मनांत येई. पण प्रकरण चिरडीला गेल्यावर दोन-ऐवजीं तीन वर्षांची मुदत आपण घातली. आणि प्रकरण चिरडीला जाण्याचें कारण म्हणजे विमलाताई. विमलाताई या एके दिवशीं आपल्याला उपदेश करूं लागल्या. 'तुम्ही आमच्या भानगडींत पडूं नका, आमचं आम्ही बघून घेऊं,' असं विमलाताईंना सांगतांच त्या म्हणाल्या, ' आपलं आपण बघून घेण्याची शक्ति तुमच्या मेंदूंत दिसत नाहीं. म्हणून मी तुम्हांला दोन फायद्याच्या गोष्टी सांगायला आलें. नसलं ऐकायचं तर नका ऐकूं. पण पुढं कांहीं मनाविरुद्ध गोष्टी झाल्या तर त्याला तयारी ठेवा. ' नंतर शांताराम विमलाताईंच्या घरीं सारखा जाऊं लागला. आणि आपल्याशीं त्याचें वागणें हळूहळू बेपर्वाईचें होऊं लागलें. '

पंधरा दिवसांपूर्वी झालेलें कडाकडीचें भांडण व आपलें माहेरीं निघून येणें हें आठवतांच शालिनीच्या हृदयाला कंप सुटला. 'पंधरा दिवस किती उजाडपणें गेले ! तो मात्र विमलाताईंच्या सहवासांत मला विसरूनहि गेला असेल.' शालिनीचें मन चरकलें. पण पुन्हां ती निश्चयानें म्हणाली, ' तत्त्वाचा प्रश्न आहे हा. मी काय म्हणून माघार घेईन ? आणखी एक वर्ष थांबण्याइतकं जर याचं माझ्यावर प्रेम नसेल तर त्या संसारांत अर्थ काय ?

' पण या गोष्टी आईला कशा समजणार ? तिच्या मनाला धक्का

बसेल. कशा या गोष्टी सांगूं मी ? मी संसार सोडून नोकरी शोध-णार आहें, ही गोष्ट आईला किती भयंकर वाटेल !'

दगडी बाकाच्या पाठीवर हात ठेवून व त्यावर तोंड लपवून शालिनी विव्हलतेनें बसली होती. तोंच सुशिलाबाईचे शब्द तिच्या कानांवर पडले—

" शालू, झोंपबीप येतेय् कीं काय ? मग इथं कशाला बसलीस ? जा बिछान्यावर पड जा. "

शालिनी दचकून नीट बसली. अगदीं सहज स्वरांत तिनें उत्तर दिलें, " नाहीं ग आई, झोंप नाहीं आली. "

" मग कांहीं होतंय् कीं काय तुला ? पंधरा दिवस जराशी आपली अशीअशीच वागते आहेस. " शालिनीशेजारीं दगडी बाकावर बसत सुशिलाबाईनीं विचारलें.

शालिनी घाबरून मनांतल्या मनांत म्हणाली, ' कसं सांगूं आईला ? ' मोठ्यानें तिनें उत्तर दिलें, " छे ग ! अशीअशी नाहीं न् कांहीं नाहीं, अगदीं मजेंत आहें मी. "

" बरं बाई, मजेंत असलीस म्हणजे झालं. नाहींतर कंटाळून लौकर गेलीस म्हणजे जांवई आम्हांला नांवं ठेवायचे. "

" आई, पण मला कंटाळा येण्याचं कारण काय ? खरंच, आई, मी माझ्या घरून इथं आलें ना म्हणजे कसं राहून राहून नवल वाटतं. कसं सगळं आपलं सुव्यवस्थित ! लहानपणापासून आठवण केली तर तुझं नी बाबांचं मोठंसं भांडण झाल्याचं किंवा कसल्या संसाराच्या आपत्तींत सांपडल्याचं कांहीं उदाहरण दिसत नाहीं. दादासारखा हुषार, सद्गुणी मुलगा, सुधावहिनीसारखी गोड

स्वभावाची सून, दोन सुंदर नातवंडं.--खरंच आई, तूं फार भाग्यवान् आहेस."

शालिनी क्षणभर थांबली. तिला वाटलं आई आतां आपल्याला उलट भाग्यवान् म्हणणार. पण सुशिलाबाई अगदीं अनपेक्षित असें बोलल्या !

"पण, शालू, मीं तपस्या केवढी बरं केली आहे !"

"म्हणजे तूं मुलासाठीं नवससायास केलेस तीच तपस्या म्हणतेस ना ? लहानपणीं आजी म्हणत असे, तूं कांहींतरी मोठं व्रत केलंस म्हणून दादा झाला."

सुशिलाबाई हंसल्या. तें हंसणें बघून शालिनीला चमत्कारिकच वाटलें. पण तिनें कांहीं विचारण्यापूर्वीच सुशिलाबाई म्हणाल्या, "सासूबाईंच्या सांगण्यावरून मुलासाठीं पांचसहा वर्षं नवससायास तर वाटेल तितके केलेत मीं. पण त्याशिवाय जी मीं तपस्या केली ती आज सांगतें तुला." सुशिलाबाई क्षणभर थांबून दिव्याच्या मंद ज्योतीकडे बघत राहिल्या. पूर्वस्मृतींचा चित्रपट जणूं त्यांच्या डोळ्यांपुढून सरकत होता.

"माझं लग्न झालं तेव्हां मी अकरा वर्षांची होतें अन् इकडे अठरावं वर्षं होतं. कॉलेजांत ते शिकत होते, अन् मला अक्षर-ओळखसुद्धां नव्हती. लग्नानंतर चारपांच वर्षं सासूबाईंनीं माझं खूप कौतुक केलं. पण मग मूल होत नाहीं म्हणून हळूहळू नेमधर्म माझ्यामागें लागले. मी सोळासतरा वर्षांची झालें तेव्हां तर आतां मला मूल होणारच नाहीं अशी सासूबाईंची निराशा होऊं लागली. त्यांची माझ्याबरली माया हळूहळू कमी होऊं लागली. इतर बायका त्यांना उपदेश करूं लागल्या कीं, 'आतां किती दिवस वाट

बघणार? आतां मुलाचं दुसरं लग्न करून टाका.' सासूबाई सांगत, 'आणखी एकदोन वर्षं वाट बघूं, नाहींतर आहेच तो मार्ग.' शालू, या सगळ्या गोष्टी कानांवर पडत असतांना माझ्या मनाची काय अवस्था होत असेल याची तुला कशी कल्पना करून देऊं? आपल्याला खरोखरीच मूल होणार नाहीं कीं काय या भीतीनं दिवसेंदिवस माझी झोंपसुद्धां नाहींशी होऊं लागली होती. अन्न-पाणी अंगीं लागेनासं होऊन प्रकृति बिघडूं लागली होती.

शालू, सतरा-अठराव्या वर्षी तुम्हां मुलींचीं लग्नंसुद्धां होत नाहींत. तुला या गोष्टी ऐकून हंसूं येत असेल. पण, शालू, माझ्या आयुष्यांतला तो काळ मीं किती दुःखांत अन् निराशेंत काढला तें माझं मलाच माहीत. सासरीं तर मला कांहीं मान राहिलाच नव्हता. सासूबाईंना मी डोळ्यांसमोर नकोशी झालें होतें. पण बाहेर कुठं जायचं यायचं म्हणजे दिखील माझ्या जिवावर येई. यांच्या वाग-ण्यांत देखील फरक पडूं लागला होता. कॉलेज सोडून हे मामंजींना व्यापारांत मदत करूं लागले होते. पण घरांत त्यांना काडीची सत्ता नव्हती, कीं सासूबाई मामंजींच्या शब्दाबाहेर जाण्याची प्राज्ञा नव्हती. त्यामुळंच पुढं मुली पाहायला सुरुवात झाल्यावर हे निमूट-पणें वागत होते. शेवटीं मला माहेरीं पाठवण्यांत आलं."

"आई, आई, केवढ्या यातना भोगल्यास तूं!" शालिनी दुःखभरानें बोलून गेली.

"पण, शालू, पुढचा काळ यापेक्षांहि भयंकर गेला. खरी तपस्या त्याच काळांत घडली. शालू, मी माहेरीं गेलें म्हणजे माझ्या पायानं जसा कांहीं दुःखाचा डोंगरच चालून गेला. दादा एवढे निग्रही बाणेदार स्वभावाचे, पण माझ्यासाठीं लहान मुलासारखे

रडले. आईचं तर कांहीं विचारायलाच नको. दादा-आई दोघांनीं माझ्या सासरीं जाऊन मामंजी-सासूबाईच्या खूप विनवण्या केल्या. पण त्यांनीं कांहीं ऐकलं नाहीं. आई-दादा निराश होऊन सोला-पूरला परत आलीं. त्या वेळीं सोलापूरला फक्त एक मिशनऱ्यांची शाळा होती. त्या शाळेंत मी जाऊं लागलें. मी वीस वर्षांची होतें. शाळेंतलीं मुलं लहानलहान अन् महारमांग अशा जातींतलीं. त्यांच्यांत बसणं मला कसंसंच वाटे. शिवाय गांवांतल्या बायका मला नी आईला दूर ठेवूं लागल्या. तेव्हां मग दादांनीं एका सिस्टरला मला स्वतंत्र शिकवायला सांगितलं. त्या सिस्टरला आम्ही ॲनीबाई म्हणत असूं. इतकी सुस्वभावी अन् प्रेमळ होती ती सिस्टर—फार हौसेनं शिकवीत असे. तिनं एक दिवस माझी हकीकत विचारून घेतली. माझी हकीकत ऐकून तिला फार वाईट वाटलें. मी घरीं जायला निघालें तेव्हां तिनं मला बजावून सांगितलं कीं, 'तुझ्या वडिलांना मला भेटायला घेऊन ये.' 'ही दादांना भेटून काय करणार?' याचं मला मोठं नवल वाटलं. तरी मीं दादांना तिचा निरोप सांगितला. आई होतीच तिथं. ती म्हणाली, 'छे कांहीं जाऊं नये. हिची हकीकत तिनं आज काढून घेतली आहे. आतां ती तुम्हांला उपदेश करील कीं तुमच्या मुलीला किरिस्ताव करून टाका व आमच्या मिशनमध्यें काम करूं द्या.' शालू, हंसतेस तूं. पण त्या वेळीं खरोखरीच लोक फार भीत असत. मिशनमध्यें मी जात होतें, पण 'तिथं तोंडांत पाणीसुद्धां घालायचं नाहीं' म्हणून आईनं मला बजावलं होतं. तरी बायका मला 'मडुम झाली, बाटली' म्हणून हिणवीत असत. दादा दुसऱ्याच दिवशीं सिस्टरला भेटले. अन् त्यानंतर बरेच वेळां भेटले. ॲनीबाई दोनतीन वेळां स्वतः आमच्या

घरीं येऊन आईशीं बोलली. ती आईदादांचं मन वळवीत होती कीं मिरजेच्या डॉक्टरला मला दाखवून जरूर पडल्यास ऑपरेशन करावं म्हणून. आणि नुसतं डॉक्टरला दाखवायला दादा-आई दोन महिने कबूल झालीं नाहींत. नंतर गांवांत कुणाला कांहीं सुगावा लागूं न देतां दादांनीं मला मिरजेला नेलं. डॉक्टरनीं मला तपासून 'ऑपरेशन करतों' म्हणून सांगितलं. पण दादा तयार होईनात. मला घेऊन ते परत सोलापुरीं गेले. तिथं पुन्हां दोन महिने गेले. ऑपरेशनला त्यांचं मन तयार होईना. पण या वेळेला मीच आईच्या पाठीमागें लागलें, म्हणून मग दोन महिन्यांनीं दादा ऑपरेशनला तयार झाले. मिरजेला मी निघालें तेव्हां आई जशी कांहीं मला शेवटली बघत होती, इतकी ती रडली. मिरजेला डॉक्टरनीं इकडे बोलावण्यास सांगितलं, तेव्हां मोठाच पेंच पडला. पण दादांनीं माझ्या सुखासाठीं पदरीं खोटेपणा बांधून घेतला. पुण्याला जाऊन ते यांना बरोबर घेऊन आले. मागून मला असं कळलं कीं, दादांनीं मामंजी-सासूबाईंना, 'वाईला एक मोठा साधु हिमालयांतून आला आहे. तो पुत्रप्राप्तीसाठीं व्रत देणारा आहे. त्यासाठीं इकडून यायलाच पाहिजे' असं सांगितलं होतं. यासाठीं मामंजी-सासूबाईंनीं फारसे आढेवेढे न घेतां यांना तर पाठवलंच, पण शिवाय आणखी एक वर्ष व्रताची फलप्राप्ति होण्याची वाट पाहण्याचं आणि तोंपर्यंत इकडच्या लग्नाचा विचार न करण्याचंहि कबूल केलं. मिरजेला आल्यावर यांना खरा प्रकार कळला. तेव्हां हे गडबडले. पण 'यांतलं अवाक्षरसुद्धां घरीं मामंजी-सासूबाईंच्या कानीं जायचं नाहीं' असं दादांनीं वचन दिल्यावर आणि मला शपथ घातल्यावर मग हे डॉक्टरकडे यायला कबूल

झाले. डॉक्टरांनीं ऑपरेशनची माहिती सांगतांच यांनीं संमति दिली आणि दोन दिवसांत ऑपरेशन झालं. हे परत पुण्याला गेले. मी महिनाभर मिरजेच्या इस्पितळांत होतें. दादा सोलापुरीं परत आले. आई मात्र माझ्याजवळ राहिली होती. मी आईबरोबर महिन्यानंतर सोलापूरला गेलें. तिथं मी आणखी तीन महिने होतें. नंतर माझी सासरीं पाठवणी करण्यांत आली. सासूबाईनीं मोठ्या ममतेनं माझं स्वागत केलं आणि उद्गार काढले 'सूनबाई, व्रतामुळं तुझ्या तोंडावर केवढं तेज आलं आहे. प्रकृतिसुद्धां किती छान झाली!' नंतर त्यांनीं 'साधूंनीं कसलं व्रत दिलं? तें कठीण होतं का?' वगैरे खूप प्रश्न विचारले आणि आईनं पढवल्याप्रमाणें मी उत्तरं देत होतें. ज्या बायका येतील त्यांना सासूबाई माझ्याकडून व्रताची हकीगत सांगत. त्यांना फार आशा उत्पन्न झाली होती. आणि देवाच्या दयेनं ती आशा सफळ होण्याचीं चिन्हं दिसूं लागलीं, तेव्हां सासूबाईना केवढा आनंद झाला. माझ्या तर सबंध आयुष्यांतलं ग्रहण सुटावयाची वेळ आली होती. केवढालीं थाटाचीं अन् किती प्रकारचीं डोहाळेजेवणं झालीं. सातव्या महिन्यांत मला माहेरीं नेलं तेव्हां मी प्रथम ॲनीबाईला भेटलें. पुढें प्रभाकर झाला, तेव्हां ॲनीबाई मला भेटायला आली होती. तिनं मला शिवणकामाची पेटी बक्षिस दिली अन् आईनं तिला आठवणी दाखल अंगठी दिली.

शालू, मग मात्र माझी तपस्या संपली आणि मला आनंदाचे दिवस लाभले."

सुशिलाबाई हंसल्या आणि शालिनीहि त्यांच्याबरोबर हंसली. तिच्या दृष्टींत केवढा तरी आदर होता.

सुशिलाबाईच जरा वेळानें बोलूं लागल्या, "पुढं प्रभाच्या पाठीवर दोन मुलगे गेले. त्या दुःखाचे चटके प्रभा असल्यामुळं आम्हांला तितके जाणवले नाहींत. पुढं प्रभाच्या मुंजीच्या धूमधडाक्यांत आम्हीं त्या दुसऱ्या मुलांचं दुःख विसरूनसुद्धां गेलों. प्रभा आठ वर्षांचा असतांना तूं झालीस. त्या वेळीं सासूबाई म्हणाल्या, 'आतां मात्र मी आनंदानं डोळे मिटायला तयार आहें.' पण देवाच्या कृपेनें आणखी दहा वर्षं त्या जगल्या."

सुशिलाबाई थांबल्या. तेव्हां शालिनी म्हणाली, "आई, आजी किती गरीब आणि प्रेमळ होती. तिनं तुला त्रास दिला असेल अशी कल्पनासुद्धां करवत नाहीं."

"त्यांनीं त्रास दिला असं म्हणण्यापेक्षां त्यांच्या मनावर झालेले रूढीचे संस्कार माझ्या दुःखाला कारण झाले असं म्हण. तुम्ही मुलं झाल्यावर माझ्या आईसारखं त्यांनीं मला वागवलं. माझी आई गेल्यावर तर त्या माझ्यावर जास्तच माया करूं लागल्या. सासूबाई वारल्या तेव्हां मला खरोखर आकाश कोसळल्यासारखं झालं. तूं लहान होतीस, पण प्रभा जाणता असल्यामुळें त्याला फार दिवस वाईट वाटत होतं. पण कालान्तरानं त्याहि दुःखाचा विसर पडला. प्रभा पहिल्या-दुसऱ्या क्लासांत पास होत होत एम्. ए., बी. कॉम्. झाला. आणि त्याला एकदम मोठी नोकरी मिळाली."

शालिनीनें अचानक प्रश्न केला, "आई, दादानं आपली आपण मुलगी पसंत केली. प्रथम तुम्हांला सुधावहिनी पसंत नव्हती. कुणीं दहा हजार रुपये हुंडा देऊं केला होता. ती मुलगी तुम्ही दादाला करून घ्यायला सांगत होतां, हें खरं कां ग?"

"शालू, खरं आहे तें. पण त्याला कारणंहि तशींच आहेत.

व्यापारांत नुकसान येऊन अब्रू जाण्याची वेळ आली होती. दहा-बारा हजार रुपये ताबडतोब उभे करणं प्राप्त होतं. अशा वेळीं प्रभासाठीं मिळणारा हुंडा म्हणजे आम्हांला देवाची देणगी वाटली. शिवाय ती मुलगी पण शिकलेली, सुस्वरूप होती. अशा वेळेला प्रभानं ती मुलगी नाकारून सुधेशीं लग्न करण्याचा निश्चय आम्हांला सांगितला. तेव्हां आम्हीं केवढ्या पेंचांत सांपडलों याची तूं कल्पना कर. हे तर प्रभाला घराबाहेर काढण्याच्या बेताला आले होते. त्या वेळीं मीं परोपरीनं त्यांना समजावून सांगितलं, तेव्हां त्यांनीं प्रभाला सुधेशीं लग्न करूं दिलं."

"अन् मग पैशाची व्यवस्था कशी झाली?" शालिनीनें विचारलें.

सुशिलाबाई क्षणमात्र बुचकळ्यांत पडल्यासारख्या झाल्या. नंतर त्यांनीं सांगितलें, "हा आपला बंगला गहाण ठेवला आणि शिवाय माझे दागिने मोडले."

"आईऽ!" शालिनीनें एकच उद्गार काढला. पण त्या वेळीं विस्मय आणि आदर या भावनांमुळें तिचा कंठ रुद्ध झाला होता.

"शालू, निढळाच्या घामानं पैसा कमावून इकडे हा बंगला सोळा-सतरा हजार रुपये खर्चून बांधलेला. तो दहा हजारांला गहाण ठेवावा लागला. या सर्व गोष्टी प्रभाला कळत असल्यामुळं त्यानं वर्षभर आपण होऊन पैशांची मदत केली. नंतर व्यापारांत तेजी येऊन दोनतीन वर्षांत बंगला मोकळा झाला."

"आई, हा बंगला म्हणजे बाबांचा जीव कीं प्राण आहे. त्यांनीं ऐकलं तरी कसं तुझं म्हणणं?"

"शालू, पुरुष, बुद्धि आणि धैर्य यांच्या जोरावर संसारांत मोठी जबाबदारी पतकरतात हें खरं आहे; पण त्यांचा स्वभाव

लहान मुलांसारखा असतो. मुलं एखाद्यावर विश्वास बसेपर्यंत कधीं बघायचीं नाहींत, भीडमुर्वत ठेवायचीं नाहींत; पण एकदां विश्वास बसला कीं, तो मनुष्य सांगेल तें ऐकतील. विश्वास बसण्यासाठीं मुलांना खाऊ द्यावा लागतो, त्यांच्या मर्जीप्रमाणं वागावं लागतं. मुलं म्हणजे जुल्मी राजे. आणि पुरुषांचीहि गत तीच असते. स्वत्व विसरून त्यांचं मन संभाळतां येईल तितक्या गोष्टींत संभाळलं तर तेहि स्वत्व विसरून आपल्या सुखासाठीं जीव सांडायला तयार होतात."

"पण, आई, मुलानं जर पावसांत हिंडायचा हट्ट धरला अन् तें उगी राहत नाहीं म्हणून त्याला पावसांत हिंडूं दिलं तर तें आजारी पडेल त्याची वाट काय ?"

"आईनंच त्याचं दुखणं काढलं पाहिजे."

"आई, स्पष्टच विचारतें आतां. पुरुषांना मुलं पाहिजेत, पण बायको मात्र पहिल्याइतकीच सुटसुटीत, तरुण अन् उत्साही राहिली पाहिजे असंहि त्यांना वाटतं."

"आमच्या वेळेला या बाबतींत सगळंच अज्ञान होतं. आतां तुम्हांला या गोष्टी पुस्तकांत वाचायला मिळतात. मग भ्यायचं काय कारण ? मीं ऑपरेशन केलं तेव्हां माझं सारं भविष्य त्या शस्त्रावर अवलंबून होतं. मी भ्यायलें असतें तर माझी दशा काय झाली असती ?"

शालिनी विचारांत पडली. सुशिलाबाई हळूहळू उठल्या. "चल आतां घरांत. मला दूध गरम करायचं आहे."

शालिनीचा हात धरून त्यांनीं तिला आंत नेली. सुशिलाबाई आंत गेल्याचें पाहून शालिनी दिवाणखान्यांतील ध्वनियंत्राशीं गेली. ध्वनियंत्राचा आवाज ऐकून सुशिलाबाई शेजारच्याच दरवाज्याजवळ निःशब्द उभ्या राहून ऐकूं लागल्या.

शालिनी म्हणत होती, " उद्यां येणार का इकडे ?"

शांतारामाचा आवाज, " नाहीं येतां येणार. विमलाताईच्या-बरोबर दुपारच्या शोला जायचं आहे."

शालिनी [ प्रेमळपणें ]—किनई, मी आज बंडवर गेलें होतें. तिथं एक युरोपिअन बाईचं इतकं गोजिरवाणं बाळ पाह्यलं. त्याच्या अंगांत एक लोंकरीचं सुरेख अंगांतलं होतं. तसलं झबलं मी विणणार आहें. त्यासाठीं तूं आपल्या पसंतीनं छानशी लोकर घेऊन ये गडे.

शांतारामाचा आवाज—तें झबलें माझ्यासाठीं का करणार आहेस तूं ?

शालिनी—इश्श ! पण तें पाह्यलंस म्हणजे तुलासुद्धां वाटेल कीं—

शांताराम—काय वाटेल ? तें झबलं अंगांत घालावं म्हणून ?

शालिनी—झबलं नव्हे, बाळ पाह्यलं कीं तुलासुद्धां हवंसं वाटेल.

शांताराम—इतके दिवस भांडून उलट माझ्याच गळ्यांत पडतेस का ?

शालिनी—मग कुणाच्या पडूं ?

शांताराम—अं ? थांब, आलोंच उद्यां.

शालिनी—अन् उद्यांचा शो ?

शांतारामानें 'डॅम इट' म्हणून जोरानें ध्वनियंत्र खालीं ठेवल्याचा आवाज झाला. शालिनी प्रफुल्ल मनानें झोंपायला गेली.

सुशिलाबाई माडीवर जातां जातां समाधानानें हंसत होत्या. ' हाहि दुःखाचा डोंगर सहजपणें देवानं निभावून नेला.' त्यांच्या मनांत विचार आला.

---